महाराष्ट्र शासन

क्रमांक-एमएमसी-२००८/४६६ /प्र क्र.१६७/२००८/नवि-२२
नगर विकास विभाग,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक- ५ जून, २०१०

प्रति,

(१) सर्व महापौर,
(२) सर्व महानगरपालिका आयुक्त,
(३) सर्व नगराध्यक्ष,
(४) आयुक्त तथा संचालक नगर परिषद प्रशासन संचालनालय,वरळी,मुंबई-३०,
(५) सर्व विभागीय आयुक्त, तथा प्रादेशिक संचालक नगर परिषद प्रशासन संचालनालय
(६) प्रधान सचिव, राज्य निवडणूक आयोग,नवीन प्रशासन भवन,मुंबई,
(७) सर्व जिल्हाधिकारी,
(८) सर्व नगरपालिकांचे मुख्याधिकारी,
(९) प्रबंधक,मुंबई उच्च न्यायालयाची सर्व खंडपीठे,
(१०) प्रबंधक, सर्व जिल्हा न्यायालये व राज्यातील इतर न्यायालये,
(११) संचालक, अखिल भारतीय स्थानिक स्वराज्य संस्था, एम.एन.रॉय कॅम्पस,
टीचर्स कॉलनीच्या मागे, वांद्रे (पूर्व), मुंबई ४०० ०५१,
(१२) महासंचालक,माहिती व जनसंपर्क संचालनालय,मंत्रालय,मुंबई (व्यापक प्रसिध्दीसाठी)

विषय: मुंबई प्रांतिक महानगरपालिका अधिनियम,१९४९, नागपूर शहर महानगरपालिका अधिनियम, १९४८, महाराष्ट्र नगरपरिषदा नगरपंचायती व औद्योगिक नगरी अधिनियम,१९६५, महाराष्ट्र(नागरी क्षेत्रे) झाडांचे संरक्षण व जतन अधिनियम,१९७५ आणि महाराष्ट्र (मोठया निवासी जागा असलेल्या)इमारतींवरील कर (पुन्हा अधिनियमित केलेला) अधिनियम,१९७९ यांमध्ये आणखी सुधारणांबाबत.

महोदय ,

मुंबई प्रांतिक महानगरपालिका अधिनियम, १९४९ नागपूर शहर महानगरपालिका अधिनियम, १९४८, महाराष्ट्र नगरपरिषदा, नगरपंचायती व औद्योगिक नगरी अधिनियम, १९६५, महाराष्ट्र(नागरी क्षेत्रे) झाडांचे संरक्षण व जतन अधिनियम, १९७५ आणि महाराष्ट्र (मोठया निवासी जागा असलेल्या)इमारतींवरील कर (पुन्हा अधिनियमित केलेला) अधिनियम, १९७९ यांमध्ये मालमत्ता करात सुसूत्रता आणण्यासाठी भांडवली मुल्यांवर आधारीत करप्रणालीनुसार मालमत्ता कर आकारणेबाबत पर्याय उपलब्ध करण्याबाबतची तरतूद समाविष्ट करणारा सन २०१० चा महाराष्ट्र अधिनियम क्रमांक १० ची प्रत तसेच सदरहू अधिनियम दिनांक १ जून, २०१० पासून अंमलात आणण्यात येत असल्याबाबतच्या समक्रमांकाच्या दिनांक ३१ मे,२०१० च्या शासन अधिसूचनेची प्रत आपल्या माहितीसाठी व उचित कार्यवाहीसाठी सोबत पाठविण्यांत येत आहे.

आपला,

(आ.श्री.जिवने )

उप सचिव, महाराष्ट्र शासन.

कृ.मा.प.

रोटा/एच-११७४(८०--६-२०१०)-७

प्रत सादर अग्रेषित(अधिनियम आणि अधिसूचनेच्या प्रतींसह)

(१) मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
(२) मा.राज्यमंत्री (नगर विकास) यांचे खाजगी सचिव
(३) प्रधान सचिव(१)(नगर विकास विभाग),मंत्रालय, मुंबई यांचे स्वीय सहाय्यक
(४) सचिव(२)(नगर विकास विभाग),मंत्रालय,मुंबई यांचे स्वीय सहाय्यक
(५) नगर विकास विभागातील सहसचिव/ उपसचिव/ अवर सचिव/ कक्ष अधिकारी
(६) वेब कोऑर्डिनेटर(नवि-२९),नगर विकास विभाग,मंत्रालय,
(७) निवडनस्ती (नवि-३२).

---




# महाराष्ट्र शासन राजपत्र

# असाधारण भाग चार

वर्ष २, अंक ५(३)] मंगळवार, एप्रिल २७, २०१०/वैशाख ७, शके १९३२ [ पृष्ठे ३८, किंमत : रुपये २६.००

असाधारण क्रमांक १४

प्राधिकृत [redacted]

महाराष्ट्र विधानमंडळाचे अधिनियम व राज्यपालांनी [redacted] अध्यादेश व केलेले विनियम.

अनुक्रमणिका



दिनांक २७ एप्रिल २०१० रोजी मा. राज्यपालांनी संमती दिलेला महाराष्ट्र विधानमंडळाचा पुढील अधिनियम माहितीसाठी यद्वारे, प्रसिद्ध करण्यात येत आहे.

ह. बा. पटेल,<br>
सचिव,<br>
महाराष्ट्र शासन,<br>
विधी व न्याय विभाग.

---

## सन २०१० चा महाराष्ट्र अधिनियम क्रमांक १०.

(मा. राज्यपालांची संमती मिळाल्यानंतर " **महाराष्ट्र शासन राजपत्रात** " दिनांक २७ एप्रिल २०१० रोजी प्रथम प्रसिद्ध केलेला अधिनियम.)

**मुंबई प्रांतिक महानगरपालिका अधिनियम, १९४९, नागपूर शहर महानगरपालिका अधिनियम, १९४८, महाराष्ट्र नगरपरिषदा, नगर पंचायती व औद्योगिक नगरी अधिनियम, १९६५, महाराष्ट्र (नागरी क्षेत्रे) झाडांचे संरक्षण व जतन अधिनियम, १९७५ आणि महाराष्ट्र (मोठ्या निवासी जागा असलेल्या) इमारतींवरील कर (पुन्हा अधिनियमित केलेला) अधिनियम, १९७९ यांत आणखी सुधारणा करण्याकरिता अधिनियम.**

**ज्याअर्थी,** यात यापुढे दिलेल्या प्रयोजनांसाठी, मुंबई प्रांतिक महानगरपालिका अधिनियम, १९४९, नागपूर शहर महानगरपालिका अधिनियम, १९४८, महाराष्ट्र नगरपरिषदा, नगर पंचायती व औद्योगिक नगरी अधिनियम, १९६५, महाराष्ट्र (नागरी क्षेत्रे) झाडांचे संरक्षण व जतन अधिनियम, १९७५ आणि महाराष्ट्र (मोठ्या निवासी जागा असलेल्या) इमारतींवरील कर (पुन्हा अधिनियमित केलेला) अधिनियम, १९७९ यांत आणखी सुधारणा करणे इष्ट आहे; **त्याअर्थी,** भारतीय गणराज्याच्या साठाव्या वर्षी, याद्वारे पुढील अधिनियम करण्यात येत आहे :— १९४९ चा मुंबई ५९. १९५० चा मध्य प्रांत व वऱ्हाड २. १९६५ चा महा. ४०. १९७५ चा महा. ४४. १९७९ चा महा. २९.

## प्रकरण एक

## **प्रारंभिक**

संक्षिप्त नाव व प्रारंभ.

१. (१) या अधिनियमास, मुंबई प्रांतिक महानगरपालिका, नागपूर शहर महानगरपालिका, महाराष्ट्र नगरपरिषदा, नगर पंचायती व औद्योगिक नगरी, महाराष्ट्र (नागरी क्षेत्रे) झाडांचे संरक्षण व जतन आणि महाराष्ट्र (मोठ्या निवासी जागा असलेल्या) इमारतींवरील कर (पुन्हा अधिनियमित केलेला) (सुधारणा) अधिनियम, २००९ असे म्हणावे.

(२) तो, राज्य शासन, राजपत्रातील अधिसूचनेद्वारे, नेमून देईल अशा दिनांकास अंमलात येईल.

## प्रकरण दोन

## **मुंबई प्रांतिक महानगरपालिका अधिनियम, १९४९ याची सुधारणा.**

सन १९४९ चा मुंबई अधिनियम क्रमांक ५९ याच्या प्रकरण अकरा मधील 'मालमत्ता कर' या शीर्षकाखालील उपशीर्षकाची सुधारणा.

२. मुंबई प्रांतिक महानगरपालिका अधिनियम, १९४९ (यात यापुढे या प्रकरणात, ज्याचा निर्देश, " प्रांतिक महानगरपालिका अधिनियम " असा करण्यात आला आहे) याच्या प्रकरण-अकरा मध्ये,— १९४९ चा मुंबई ५९.

(१) कलम १२८ मधील, खंड (१) वगळण्यात येईल ;

(२) " मालमत्ता कर " या शीर्षकाखालील " बसवता येण्याजोगे मालमत्ता कर " या उपशीर्षकाऐवजी पुढील उपशीर्षक दाखल करण्यात येईल :—

" करयोग्य मूल्य किंवा भांडवली मूल्य यांवर बसवता येण्याजोगे मालमत्ता कर ".

३. प्रांतिक महानगरपालिका अधिनियमाच्या प्रकरण-अकरा मध्ये, अशा प्रकारे दाखल करण्यात आलेल्या उपशीर्षकानंतर, पुढील कलम समाविष्ट करण्यात येईल :— सन १९४९ चा मुंबई अधिनियम क्रमांक ५९ यामध्ये कलम १२८क समाविष्ट करणे.

" १२८क. (१) या अधिनियमान्वये शहरातील इमारती व जमिनी यांवर बसवला जाण्याजोग्या मालमत्ता करांत, पाणीपट्टी, पाणी लाभ कर, मलनिस्सारण कर, मलनिस्सारण लाभ कर, सर्वसाधारण कर, शिक्षण उपकर, पथकर व सुधार आकार यांचा समावेश होईल. मालमत्ता करामध्ये कोणत्या करांचा समावेश होतो.

(२) मालमत्ता कर बसविण्याच्या प्रयोजनासाठी " इमारत " या शब्दप्रयोगामध्ये, सदनिका, गाळा, युनिट किंवा इमारतीचा कोणताही भाग यांचा समावेश होतो.

(३) सर्व किंवा कोणतेही मालमत्ता कर क्रमशः वाढत्या प्रमाणात लावता येतील.

(४) या अधिनियमात अन्यथा तरतूद केली असेल त्याव्यतिरिक्त, महानगरपालिका, कलम १२९ च्या पोट-कलम (२) अन्वये, इमारतींवर व जमिनीवर त्यांच्या भांडवली मूल्याच्या आधारे कोणतेही किंवा सर्व मालमत्ता कर बसविण्याच्या पद्धतीचा स्वीकार करीपर्यंत, अशा इमारतींच्या व जमिनींच्या करयोग्य मूल्यावर सर्व किंवा कोणताही मालमत्ता कर बसविणे महानगरपालिकेने चालू ठेवणे हे कायदेशीर असेल.".

४. प्रांतिक महानगरपालिका अधिनियमाच्या कलम १२९ मध्ये,— सन १९४९ चा मुंबई अधिनियम क्रमांक ५९ याच्या कलम १२९ ची सुधारणा.

(१) विद्यमान समासटीपेऐवजी, पुढील समासटीप दाखल करण्यात येईल :—

" करयोग्य मूल्यावर किंवा, यथास्थिति, भांडवली मूल्यावर बसवला जाण्याजोगे मालमत्ता कर व ते कोणत्या दरांनी बसवता येण्याजोगे असतील. ";

(२) प्रांतिक महानगरपालिका अधिनियमाच्या कलम १२९ ला त्याचा पोट-कलम (१) असा नवीन क्रमांक देण्यात येईल ; आणि

(क) अशा प्रकारे नवीन क्रमांक देण्यात आलेल्या पोट-कलम (१) मध्ये,—

(एक) " कलम १२७," या मजकुराने सुरू होणाऱ्या आणि " समावेश होईल " या मजकुराने संपणाऱ्या मजकुराऐवजी, " पुढील मालमत्ता कर, यात यापुढे दिलेल्या अपवादांच्या, मर्यादांच्या व शर्तींच्या अधीन राहून, शहरातील इमारती व जमिनी यांवर बसवण्यात येतील " हा मजकूर दाखल करण्यात येईल ;

(दोन) खंड (क) मध्ये, " करयोग्य मूल्याच्या " या मजकुरानंतर, " किंवा, यथास्थिति, त्यांच्या भांडवली मूल्याच्या " हा मजकूर समाविष्ट करण्यात येईल ;

(तीन) खंड (कक) मध्ये, " करयोग्य मूल्याच्या " या मजकुरानंतर, " किंवा, यथास्थिति, त्यांच्या भांडवली मूल्याच्या " हा मजकूर समाविष्ट करण्यात येईल ;

(चार) खंड (ख) मध्ये, " करयोग्य मूल्याच्या " या मजकुरानंतर, " किंवा, यथास्थिति, त्यांच्या भांडवली मूल्याच्या " हा मजकूर समाविष्ट करण्यात येईल ;

(पाच) खंड (खख) मध्ये, " करयोग्य मूल्याच्या " या मजकुरानंतर, " किंवा, यथास्थिति, त्यांच्या भांडवली मूल्याच्या " हा मजकूर समाविष्ट करण्यात येईल ;

(सहा) खंड (ग) मध्ये,—

(क) " त्यांच्या करयोग्य मूल्याच्या बारा टक्क्याहून कमी नाही " या मजकुरानंतर, " किंवा, यथास्थिति, त्यांच्या भांडवली मूल्याच्या ०.१ टक्क्यांहून कमी नाही आणि १ टक्क्याहून अधिक नाही " हा मजकूर समाविष्ट करण्यात येईल ;

(ख) " त्यांच्या वार्षिक मूल्याच्या कमीत कमी एक अष्टमांश टक्क्याइतके आणि जास्तीत जास्त दोन टक्क्यांपर्यंत " या मजकुरानंतर, " किंवा, यथास्थिति, त्यांच्या भांडवली मूल्याच्या कमीत कमी ०.०१ टक्क्यांइतके आणि जास्तीत जास्त ०.२ टक्क्यांपर्यंत " हा मजकूर समाविष्ट करण्यात येईल ;

(सात) खंड (ङ) नंतर, पुढील खंड समाविष्ट करण्यात येईल :—

" (च) प्रकरण-सोळा अन्वये बसवता येण्याजोगा सुधार आकार. ";

(आठ) पहिले परंतुक वगळण्यात येईल ;

(ख) अशा प्रकारे नवीन क्रमांक देण्यात आलेल्या पोट-कलम (१) नंतर, पुढील पोट-कलम जादा दाखल करण्यात येईल :—

" (२) या अधिनियमाच्या अन्य कोणत्याही तरतुदींमध्ये काहीही अंतर्भूत असले तरी, परंतु पोट-कलम (१) च्या परंतुकामध्ये व स्पष्टीकरणामध्ये तरतूद केली असेल त्या व्यतिरिक्त महानगरपालिकेला कलम ९९ च्या तरतुदींनुसार तिला निर्धारित करता येईल अशा दरांनी व अशा दिनांकास आणि त्या दिनांकापासून इमारतींच्या व जमिनींच्या भांडवली मूल्यांच्या आधारे शहरातील इमारतींवर व जमिनींवर मालमत्ता कर बसविण्याची पद्धत स्वीकारण्याचा ठराव संमत करता येईल :

परंतु, भांडवली मूल्यावर असा मालमत्ता कर बसविण्यात आला असेल अशा दिनांकापासून पाच वर्षांच्या कालावधीसाठी, असा कर,—

(एक) निवासी प्रयोजनांसाठी वापरण्यात येणाऱ्या इमारतींच्या बाबतीत, अशा दिनांकाच्या लगतपूर्वीच्या वर्षामध्ये त्यांच्याबाबतीत बसवता येण्याजोग्या असलेल्या मालमत्ता कराच्या रकमेच्या दुप्पट रकमेपेक्षा अधिक असणार नाही, आणि

(दोन) अनिवासी प्रयोजनांसाठी वापरण्यात येणाऱ्या इमारतींच्या किंवा जमिनींच्या बाबतीत, अशा दिनांकाच्या लगतपूर्वीच्या वर्षामध्ये त्यांच्याबाबतीत बसवता येण्याजोग्या असलेल्या मालमत्ता कराच्या रकमेच्या तिप्पट रकमेपेक्षा अधिक असणार नाही :

परंतु, आणखी असे की, अनुसूची 'घ' च्या प्रकरण आठ मधील कराधान नियमांच्या नियम ७-अ च्या पोट-नियम (३) अन्वये सुधारित केलेल्या कोणत्याही इमारतींच्या किंवा जमिनींच्या, भांडवली मूल्याच्या आधारे बसवलेला मालमत्ता कर हा, काहीही असले तरी, अशा सुधारणा केलेल्या वर्षाच्या लगतपूर्वीच्या वर्षामध्ये देय असलेल्या मालमत्ता कराच्या ४० टक्के इतक्या रकमेहून अधिक असणार नाही :

परंतु तसेच, या पोट-कलमान्वये भांडवली मूल्य हा आधार समजून मालमत्ता कर बसविण्याचा स्वीकार केल्याच्या वर्षापासून सुरू होणाऱ्या पाच वर्षांच्या कालावधीकरिता ४६.४५ चौरस मीटर (५०० चौरस फूट) किंवा त्यापेक्षा कमी फरसबंद क्षेत्र असलेल्या निवासी इमारतींच्या किंवा निवासी गाळ्यांच्या संबंधात बसवावयाची मालमत्ता कराची रक्कम, भांडवली मूल्य हा आधार समजून मालमत्ता कर बसविण्याचा स्वीकार केल्याच्या वर्षाच्या लगतपूर्वीच्या वर्षामध्ये बसविलेल्या व देय असलेल्या मालमत्ता कराच्या रकमेपेक्षा अधिक असणार नाही.

स्पष्टीकरण.—या कलमाच्या प्रयोजनांसाठी, महानगरपालिकेने, भांडवली मूल्य हा आधार समजून, मालमत्ता कर बसविण्याचा स्वीकार केल्यानंतर, करयोग्य इमारतींच्या संबंधातील मालमत्ता करामध्ये, प्रत्येक पाच वर्षांनंतर सुधारणा करण्यात येईल आणि अशा प्रत्येक सुधारणेनंतर, अशी मालमत्ता कराची रक्कम, कोणत्याही बाबतीत सुधारणा केल्याच्या वर्षाच्या लगत पूर्वीच्या वर्षामध्ये बसविलेल्या व देय असलेल्या मालमत्ता कराच्या रकमेच्या चाळीस टक्क्यांहून अधिक असणार नाही. ".

५. प्रांतिक महानगरपालिका अधिनियमाच्या कलम १३३ मध्ये,— सन १९४९ चा मुंबई अधिनियम, क्रमांक ५९ याच्या कलम १३३ ची सुधारणा.

(१) पोट-कलम (१) मध्ये, " पोट-कलम (२) " या मजकुरानंतर, " (२ क) " हा मजकूर समाविष्ट करण्यात येईल ;

(२) पोट-कलम (२) नंतर, पुढील पोट-कलम समाविष्ट करण्यात येईल :—

" (२ क) महानगरपालिकेने इमारतींच्या व जमिनींच्या भांडवली मूल्यावर मालमत्ता कर बसविण्याचा स्वीकार केला असेल तर, शासनाकडे निहित असलेल्या व किंवा शासनाच्या भोगवट्यात असलेल्या शहरातील ज्या इमारतींच्या व जमिनींच्या संबंधात, अशा नापसी दिली गेली नसती तर, राज्य शासनाकडून सर्वसाधारण कर बसविण्यात आला असता, त्याबाबतीत त्या इमारतींचे व जमिनींचे भांडवली मूल्य हे शासकीय अभिलेखामधील अशा जमिनींच्या किंवा इमारतींच्या पुस्तकी मूल्याइतके असेल, आणि असे भांडवली मूल्य पाच वर्षांच्या मुदतीकरिता अंमलात राहील ; मात्र दरम्यान, शासनाकडे निहित असलेल्या इमारतींची व जमिनींची संख्या किंवा व्याप्ती यात मोठ्या प्रमाणात वाढ किंवा घट झाली तर त्या वाढीच्या किंवा घटीच्या प्रमाणातच अशा मूल्यात बदल होईल. ";

(३) पोट-कलम (३) मध्ये,—

(क) " करयोग्य मूल्यावर " या मजकुरानंतर, " किंवा, यथास्थिति, भांडवली मूल्यावर " हा मजकूर समाविष्ट करण्यात येईल ;

(ख) " पोट-कलम (२) " या मजकुरानंतर, " किंवा, यथास्थिति, पोट-कलम (२ क) " हा मजकूर जादा दाखल करण्यात येईल.

६. प्रांतिक महानगरपालिका अधिनियमाच्या कलम १३९ मध्ये, पोट-कलम (१), खंड (क), नंतर, पुढील उप खंड जादा दाखल करण्यात येतील :— सन १९४९ चा मुंबई अधिनियम क्रमांक ५९ याच्या कलम १३९ ची सुधारणा.

" (क-१) जी मालक नाही अशा व्यक्तीने जागा धारण केली असेल किंवा ती जिचा भोगवटा करीत असेल आणि जागेच्या मालकाचा ठावठिकाणा निश्चित माहीत नसेल तर अशा धारकाकडून किंवा भोगवटादाराकडून ; आणि

(क-२) विकासकाने किंवा मुखत्याराने अथवा कोणत्याही व्यक्तीने जागा धारण केली असेल किंवा तिचा विकास केला असेल मग अशा व्यक्तीने कोणत्याही नावाने ती जागा धारण केलेली असेल आणि त्यांपैकी प्रत्येकाला त्या जागेची विक्री करण्याचा अधिकार असेल किंवा तिने ती संपादित केली असेल तर अशा धारकाकडून, विकासकाकडून, मुखत्याराकडून किंवा, यथास्थिति, त्या व्यक्तीकडून :

परंतु, अशा धारक, विकासक, मुखत्यार किंवा व्यक्ती प्रत्यक्ष विक्री होईपर्यंतच असा कर वसूल केला जाण्यास पात्र असेल.".

सन १९४९ चा मुंबई अधिनियम, क्रमांक ५९ याच्या कलम १४० ची सुधारणा.

७. प्रांतिक महानगरपालिका अधिनियमाच्या कलम १४० मध्ये,—

(१) पोट-कलम (१) नंतर, पुढील पोट-कलम समाविष्ट करण्यात येईल :—

"(१ क) पोट-कलम (१) मध्ये काहीही अंतर्भूत असले तरी, कलम १२९ च्या पोट-कलम (२) अन्वये मालमत्ता कर बसविण्याकरिता, भांडवली मूल्य हा आधार समजून स्वीकार म्हणून स्वीकृत केल्याच्या दिनांकास आणि दिनांकापासून, परंतु या अधिनियमाच्या इतर तरतुदीस अधीन राहून, आयुक्तास, उक्त जागेच्या अशा भोगवटादाराला मालमत्ता कराच्या रकमेकरिता बिल देता येईल किंवा, अशा जागेचे दोन किंवा अधिक भोगवटादार असतील तर, त्यापैकी प्रत्येकावर भांडवली मूल्यावर आधारित कराच्या संपूर्ण रकमेसाठी देय असलेल्या रकमेच्या भागाकरिता, उक्त जागेचे संबंधात भांडवली मूल्यावर आधारित कराच्या एकूण रकमेशी, एक किंवा अनेक भोगवटादारांच्या जागेच्या अशा भागासाठी असलेल्या भांडवली मूल्याच्या, त्याच प्रमाणात देय असलेल्या रकमेकरिता बील देता येईल.";

(२) पोट-कलम (३) मधील, "एक वर्षापेक्षा अधिक मुदतीपर्यंत देण्याची राहिली असेल, किंवा" हा मजकूर वगळण्यात येईल.

सन १९४९ चा मुंबई अधिनियम, क्रमांक ५९ याच्या कलम १४८ क ची सुधारणा.

८. प्रांतिक महानगरपालिका अधिनियमाच्या कलम १४८ क मधील पोट-कलम (१) मध्ये,—

(१) "महानगरपालिका निश्चित करील त्याप्रमाणे" या मजकुराने सुरू होणाऱ्या आणि "बसविता येईल" या मजकुराने संपणाऱ्या मजकुराऐवजी पुढील मजकूर दाखल करण्यात येईल :—

"महानगरपालिका निश्चित करील त्याप्रमाणे करयोग्य मूल्याच्या किंवा, यथास्थिति, भांडवली मूल्याच्या पाच टक्क्यांहून अधिक असणार नाही एवढे टक्के जादा कर (यात यापुढे ज्याचा निर्देश "शिक्षण उपकर" असा करण्यात आला आहे) बसवू शकेल :";

(२) खंड (ग) मधील परंतुकामध्ये "करयोग्य मूल्य" या मजकुरानंतर "किंवा यथास्थिति, भांडवली मूल्य" हा मजकूर समाविष्ट करण्यात येईल.

सन १९४९ चा मुंबई अधिनियम, क्रमांक ५९ याच्या कलम १४८ ख ची सुधारणा.

९. प्रांतिक महानगरपालिका अधिनियमाच्या कलम १४८ ख मधील, पोट-कलम (१) मध्ये,

(१) "करयोग्य मूल्यावर" या मजकुरानंतर "किंवा यथास्थिती भांडवली मूल्यावर" हा मजकूर समाविष्ट करण्यात येईल ;

(२) "पोट-कलम (२)" या मजकुरानंतर "किंवा पोट-कलम (२ क)" हा मजकूर समाविष्ट करण्यात येईल ;

सन १९४९ चा मुंबई अधिनियम, क्रमांक ५९ याच्या कलम १४८ ग ची सुधारणा.

१०. प्रांतिक महानगरपालिका अधिनियमाच्या कलम, १४८ ग मधील, पोट-कलम (१) मध्ये,—

(१) "इतके टक्के" या मजकुरानंतर "किंवा यथास्थिति त्याच्या भांडवली मूल्याइतके टक्के" हा मजकूर समाविष्ट करण्यात येईल ;

(२) परंतुका मधील खंड (ग) मध्ये "करयोग्य मूल्य" या मजकुरानंतर "किंवा यथास्थिति, भांडवली मूल्य" हा मजकूर समाविष्ट करण्यात येईल ;

११. प्रांतिक महानगरपालिका अधिनियमाच्या कलम, ४०६ मधील,— सन १९४९ चा मुंबई अधिनियम, क्रमांक ५९ याच्या कलम ४०६ ची सुधारणा.

(१) पोट-कलम (१) मध्ये " करयोग्य मूल्य " या मजकुरानंतर " किंवा यथास्थिति भांडवली मूल्य " हा मजकूर समाविष्ट करण्यात येईल ;

(२) पोट-कलम (२) मध्ये,—

(क) खंड (ख) मध्ये " करयोग्य मूल्याविरुद्ध " या मजकुरानंतर " किंवा यथास्थिति, भांडवली मूल्याविरुद्ध " हा मजकूर समाविष्ट करण्यात येईल ,

(ख) खंड (ड) मध्ये " पंधरा दिवसांच्या " या मजकुराऐवजी " एकवीस दिवसांच्या " हा मजकूर दाखल करण्यात येईल ;

(ग) खंड (ङ) मध्ये, " करयोग्य मूल्याविरुद्ध " व " करयोग्य मूल्याच्या " अनुक्रमाने येणाऱ्या मजकुराऐवजी अनुक्रमे " किंवा यथास्थिति भांडवली मूल्याविरुद्ध " व " किंवा यथास्थिति भांडवली मूल्याच्या " हा मजकूर समाविष्ट करण्यात येईल ;

(३) पोट-कलम (२), नंतर पुढील पोट-कलम समाविष्ट करण्यात येईल :—

" (२क) पोट-कलम (२) च्या खंड (क) ते (ङ) च्या तरतुदीनुसार जर अपील दाखल केले नसेल तर, ते अपील फेटाळून लावण्यास पात्र ठरेल.

१२. प्रांतिक महानगरपालिका अधिनियमाच्या कलम ४०७ मधील खंड (क) मध्ये, " कर योग्य मूल्याविरुद्ध " या मजकुरानंतर " किंवा यथास्थिति, भांडवली मूल्याविरुद्ध " हा मजकूर समाविष्ट करण्यात येईल ; सन १९४९ चा मुंबई अधिनियम, क्रमांक ५९ याच्या कलम, ४०७ ची सुधारणा.

१३. प्रांतिक महानगरपालिका अधिनियमाच्या कलम, ४०८ मध्ये,— सन १९४९ चा मुंबई अधिनियम, क्रमांक ५९ याच्या कलम, ४०८ ची सुधारणा.

(क) " करयोग्य मूल्य " या मजकुरानंतर " किंवा यथास्थिति, भांडवली मूल्य " हा मजकूर समाविष्ट करण्यात येईल ;

१९४० चा १०. १९९६ चा २६. (ख) " लवाद अधिनियम, १९४० " या मजकुराऐवजी " लवाद व समेट अधिनियम, १९९६ " हा मजकूर दाखल करण्यात येईल.

१४. प्रांतिक महानगरपालिका अधिनियमाच्या कलम. ४०९ वगळण्यात येईल. सन १९४९ चा मुंबई अधिनियम, क्रमांक ५९ याचे कलम, ४०९ वगळणे

सन १९४९ चा मुंबई अधिनियम, क्रमांक ५९ याच्या कलम ४१० ची सुधारणा.

१५. प्रांतिक महानगरपालिका अधिनियमाच्या कलम ४१० मध्ये, " करयोग्य मूल्य " या मजकुरानंतर " किंवा, यथास्थिति, भांडवली मूल्य " हा मजकूर समाविष्ट करण्यात येईल.

सन १९४९ चा मुंबई अधिनियम, क्रमांक ५९ याच्या कलम, ४११ ची सुधारणा.

१६. प्रांतिक महानगरपालिका अधिनियमाच्या कलम, ४११ मधील, खंड (क) मध्ये, " दोन हजार रुपयांपेक्षा अधिक करयोग्य मूल्य " या मजकुराऐवजी " करयोग्य मूल्य किंवा, यथास्थिति, भांडवली मूल्य " हा मजकूर दाखल करण्यात येईल.

सन १९४९ चा मुंबई अधिनियम, क्रमांक ५९ याच्या कलम, ४१२ ची सुधारणा.

१७. प्रांतिक महानगरपालिका अधिनियमाच्या कलम, ४१२ मधील, " आणि कलम ४०१ अन्वये मूल्यनिर्धारणाचा " हा मजकूर वगळण्यात येईल.

सन १९४९ चा मुंबई अधिनियम, क्रमांक ५९ याच्या कलम, ४१३ ची सुधारणा.

१८. प्रांतिक महानगरपालिका अधिनियमाच्या कलम, ४१३ मधील,—

(१) पोट-कलम (१) मध्ये, " करयोग्य मूल्याविरुद्ध " व " करयोग्य मूल्य " या अनुक्रमाने येणाऱ्या, मजकुरानंतर अनुक्रमे " किंवा, यथास्थिति भांडवली मूल्य विरुद्ध " व " किंवा, यथास्थिति भांडवली मूल्य " हा मजकूर समाविष्ट करण्यात येईल.

(२) पोट-कलम (२) ऐवजी, पुढील पोट-कलम दाखल करण्यात येईल :-

" (२) या न्यायाधीशाचा निर्णय अंतिम नसेल तर, तथापि, कलम ४०६ च्या तरतुदींना अधीन राहून, आयुक्ताने करदात्याला अनुसूची ' अ ' च्या प्रकरण आठ मधील कराधान नियमाच्या नियम, ७ किंवा ७ क अन्वये निर्धारित केलेल्या करयोग्य मूल्याच्या किंवा यथास्थिति, भांडवली मूल्याच्या आधारे मालमत्ता कराचे निर्धारण करणे कायदेशीर असेल. ".

सन १९४९ चा मुंबई अधिनियम, क्रमांक ५९ याच्या कलम, ४१५ ची सुधारणा.

१९. प्रांतिक महानगरपालिका अधिनियमाच्या कलम ४१५ मधील पोट-कलम (२) मध्ये,—

(क) " करयोग्य मूल्य " या मजकुरानंतर " किंवा यथास्थिति, भांडवली मूल्य " हा मजकूर समाविष्ट करण्यात येईल ;

(ख) " दोन हजार रुपयांपेक्षा अधिक असेल तर " या मजकुराऐवजी " राज्य शासन राजपत्रातील अधिसूचनेद्वारे विनिर्दिष्ट करता येईल अशा रकमेपेक्षा अधिक असेल तर " हा मजकूर दाखल करण्यात येईल.

सन १९४९ चा मुंबई अधिनियम, क्रमांक ५९ याच्या कलम, ४८९ ची सुधारणा.

२०. प्रांतिक महानगरपालिका अधिनियमाच्या कलम, ४८९ मधील, पोट-कलम (१) मधील, खंड (घ) मध्ये, " करयोग्य मूल्य " या मजकुरानंतर " किंवा यथास्थिति, भांडवली मूल्य " हा मजकूर समाविष्ट करण्यात येईल.

२१. प्रांतिक महानगरपालिका अधिनियमाच्या अनुसूची ' घ ' च्या प्रकरण आठ मधील, कराधान नियम (यात यापुढे ज्याचा निर्देश " कराधान नियम " असा करण्यात आला आहे.) याच्या नियम २ मध्ये,—

(१) समास टिपेमधील " नोटिशीचा नमुना " या मजकुरानंतर " आणि मालकी हक्काच्या हस्तांतरणाबाबतची देय फी " हा मजकूर जादा दाखल करण्यात येईल.

(२) पोट-नियम (२) मधील " भारतीय " हा मजकूर वगळण्यात येईल.

सन १९४९ चा मुंबई अधिनियम क्रमांक ५९ याच्या अनुसूची ' घ ' मधील प्रकरण आठच्या नियम २ ची सुधारणा.

२२. कराधान नियमांच्या नियम ४ मधील, पोट-नियम (१) मधील " भारतीय " हा मजकूर वगळण्यात येईल.

सन १९४९ चा मुंबई अधिनियम क्रमांक ५९ याच्या अनुसूची ' घ ' मधील प्रकरण आठच्या नियम ४ ची सुधारणा

२३. कराधान नियमांच्या नियम ५ मधील,—

(१) पोट-नियम (१) मध्ये, " पुन्हा भोगवटा करण्यात येईल तेव्हा, " या मजकुरानंतर, " किंवा संपूर्ण इमारत किंवा इमारतीच्या भागांमधील वापरकर्त्यांमध्ये बदल करण्यात येईल तेव्हा, " हा मजकूर समाविष्ट करण्यात येईल ;

(२) पोट-नियम (२) मध्ये, " तिचा पुन्हा भोगवटा करण्यात आल्याच्या दिनांकापासून " या मजकुरानंतर " आणि संपूर्ण इमारत किंवा इमारतीच्या भागामधील वापरकर्त्यांच्या बदलाच्या प्रकरणामध्ये वापरकर्त्यांच्या अशा बदलांच्या दिनांकापासून " हा मजकूर शेवटी जादा दाखल करण्यात येईल.

सन १९४९ चा मुंबई अधिनियम क्रमांक ५९ याच्या अनुसूची ' घ ' मधील प्रकरण आठच्या नियम ५ ची सुधारणा.

२४. कराधान नियमांच्या नियम ७ नंतर, पुढील नियम समाविष्ट करण्यात येईल :—

सन १९४९ चा मुंबई अधिनियम क्रमांक ५९ याच्या अनुसूची ' घ ' मधील प्रकरण आठ मध्ये नियम ७ क समाविष्ट करणे.

१९५८ च्या मुंबई ६०.

" (७ क.) (१) मालमत्ता कर आकारणीयोग्य असलेल्या कोणत्याही इमारतीचे किंवा जमिनीचे भांडवली मूल्य निश्चित करण्यासाठी, आयुक्त, मुंबई मुद्रांक अधिनियम, १९५८ याच्या तरतुदीन्वये, तयार केलेले मुंबई मुद्रांक (संपत्तीचे वास्तविक बाजार मूल्य ठरवणे) नियम, १९९५ अन्वये, तयार केलेल्या व त्या त्या वेळी अंमलात असलेल्या मुद्रांक शुल्क सिद्ध गणकामध्ये दर्शवलेले कोणत्याही इमारतीचे किंवा जमिनीचे मूल्य लक्षात घेईल अथवा जिचे भांडवली मूल्य निर्धारित करणे आवश्यक आहे अशी इमारत किंवा जमीन ज्या क्षेत्रातील असेल अशा कोणत्याही विशिष्ट क्षेत्रातील कोणत्याही मालमत्तांचे मूल्य मुद्रांक शुल्क सिद्ध गणकामध्ये दाखविण्यात आले नसेल तर किंवा एखाद्यावेळी असे मुद्रांक शुल्क सिद्ध गणक अस्तित्वात आले नसेल तर, त्याबाबतीत आयुक्तास, अशा इमारतीचे किंवा

भांडवली मूल्य करून निर्धारित करणे.

जमिनीचे बाजार मूल्य आधारभूत मूल्य म्हणून, विचारात घेऊन, तसेच पुढील घटक देखील विचारात घेऊन तिचे भांडवली मूल्य निश्चित करता येईल :-

(क) जमिनीचे स्वरूप व प्रकार आणि इमारतीची संरचना ;

(ख) जमिनीचे क्षेत्र किंवा इमारतीचे चटई क्षेत्र ;

(ग) वापरकर्ता प्रवर्ग म्हणजे (एक) निवासी, (दोन) वाणिज्यिक (दुकाने, किंवा तत्सम), (तीन) कार्यालये, (चार) हॉटेले (चार तारांकितपर्यंत), (पाच) हॉटेले (चार तारांकितपेक्षा अधिक), (सहा) बँका, (सात) उद्योग व कारखाने, (आठ) शालेय व महाविद्यालयीन इमारत किंवा शैक्षणिक प्रयोजनांसाठी वापरण्यात येणारी इमारत (नऊ) मॉल, आणि (दहा) वरीलपैकी कोणत्याही प्रवर्गांमध्ये समाविष्ट नसलेली अन्य कोणतीही इमारत किंवा जमीन ;

(घ) इमारत किती वर्ष जुनी आहे ; किंवा

(ङ) पोट-नियम (२) अन्वये केलेल्या विनियमाद्वारे विनिर्दिष्ट करण्यात येतील असे अन्य काही घटक.

(२) आयुक्त, पोट-नियम (१) अन्वये भांडवली मूल्य निश्चित करण्याच्या प्रयोजनाकरिता स्थायी समितीच्या मान्यतेने, इमारतींच्या किंवा जमिनीच्या प्रवर्गाचा तपशिलाच्या बाबतीत अशा विविध प्रवर्गांना नेमून द्यावयाच्या बहुविध भारांकाच्या बाबतीत विनियम तयार करील.

(३) कोणत्याही इमारतीचे किंवा जमिनीचे पोट-नियम (१) अन्वये निश्चित केलेले भांडवली मूल्य दर पाच वर्षांनी सुधारित करता येईल :

परंतु, आयुक्तास, कारणे लेखी नमूद करून, उक्त पाच वर्षांच्या कालावधीत कोणत्याही वेळी, कोणत्याही इमारतीचे किंवा जमिनीचे भांडवली मूल्याचे सुधारित करता येईल आणि तदनुसार तो, नियम २७ अन्वये, अशा इमारतींच्या किंवा जमिनींच्या संबंधात, आकारणी पुस्तकात त्याअनुसार सुधारणा करील.

(४) नियम ७ चे पोट-नियम (२), (३) व (४) यांच्या तरतुदी, योग्य त्या फेरफारांसह भांडवली मूल्य निश्चित करण्यासाठी देखील लागू असतील.".

सन १९४९ चा मुंबई अधिनियम क्रमांक ५९ यातील अनुसूची 'घ' मधील प्रकरण आठच्या नियम ८ ची सुधारणा.

२५. कराधान नियमांच्या नियम ८ मधील, पोट-नियम (१) मध्ये,—

(१) "ज्या दोन ठिकाणी " मूल्य " हा शब्द आला असेल त्या दोन्ही ठिकाणी त्या ऐवजी "करयोग्य मूल्य किंवा, यथास्थिती, भांडवली मूल्य" हा मजकूर दाखल करण्यात येईल.

(२) खंड (ग) नंतर, पुढील खंड जादा दाखल करण्यात येईल :-

"(घ) अशा कोणत्याही इमारतींच्या किंवा जमिनींच्या किंवा त्यांच्या कोणत्याही भागाच्या संबंधात नियम ७ क च्या पोट-नियम (१) च्या खंड (क) ते (ङ) मध्ये नमूद करण्यात आलेल्या कोणत्याही किंवा सर्व बाबींच्या बाबतीतील तपशील.".

२६. कराधान नियमांच्या नियम ९ मध्ये,— सन १९४९ चा मुंबई अधिनियम क्रमांक ५९ याच्या अनुसूची 'घ' मधील प्रकरण आठच्या नियम ९ ची सुधारणा.

(१) " "आकारणी पुस्तक" या नावाचे एक पुस्तक ठेवले पाहिजे आणि त्यात" या मजकुराऐवजी "स्थायी समितीच्या मान्यतेने ते ठरवील अशा नमुन्यात व रीतीने "आकारणी पुस्तक" या नावाचे एक पुस्तक ठेवले पाहिजे" हा मजकूर दाखल करण्यात येईल ;

(२) खंड (ख) मध्ये, "करयोग्य मूल्य" या मजकुरानंतर, "किंवा, यथास्थिती, भांडवली मूल्य" हा मजकूर समाविष्ट करण्यात येईल ;

(३) खंड (घ) ऐवजी पुढील खंड दाखल करण्यात येईल:—

"(घ) अशी कोणतीही इमारत किंवा जमीन सामान्य कराच्या आकारणीस जबाबदार नसेल, तर किंवा तिला मालमत्ता कर भरण्यातून संपूर्णतः किंवा तिच्या काही भागाकरिता सूट मिळाली असेल, तर, ती अशी जबाबदार नसल्याबद्दलची किंवा, यथास्थिती, सूट मिळाल्याबद्दलची कारणे ;";

(४) खंड (ङ) मध्ये, " करयोग्य मूल्याच्या " या मजकुरानंतर, " किंवा, यथास्थिती, भांडवली मूल्याच्या" हा मजकूर समाविष्ट करण्यात येईल.

२७. कराधान नियमांच्या नियम १० मधील पोट-नियम (१) मध्ये, " निवडणुकांच्या प्रयोजनांसाठी " या मजकुराऐवजी, "प्रशासकीय प्रयोजनांसाठी" हा मजकूर दाखल करण्यात येईल. सन १९४९ चा मुंबई अधिनियम क्रमांक ५९ यातील अनुसूची 'घ' मधील प्रकरण आठच्या नियम १० ची सुधारणा.

२८. कराधान नियमांच्या नियम १३ मधील, पोट-नियम (२) मध्ये, " प्रभागातील ठळक ठिकाणी मोठ्या जाहिराती लावून " या मजकुरानंतर " किंवा आयुक्तास योग्य वाटेल अशा इलेक्ट्रॉनिक प्रसार माध्यमासह अन्य कोणत्याही पद्धतीद्वारे" हा मजकूर जादा दाखल करण्यात येईल. सन १९४९ चा मुंबई अधिनियम क्रमांक ५९ यातील अनुसूची 'घ' मधील प्रकरण आठच्या नियम १३ ची सुधारणा.

२९. कराधान नियमांच्या नियम १५ मध्ये,— सन १९४९ चा मुंबई अधिनियम क्रमांक ५९ याच्या अनुसूची 'घ' मधील प्रकरण आठच्या नियम १५ ची सुधारणा.

(१) पोट-नियम (१) मध्ये,—

(क) " पंधरा दिवसांच्या " या मजकुराऐवजी " एकवीस दिवसांच्या " हा मजकूर दाखल करण्यात येईल ;

(ख) " करयोग्य मूल्याच्या " या मजकुरानंतर, " किंवा, यथास्थिती, भांडवली मूल्याच्या " हा मजकूर समाविष्ट करण्यात येईल ;

(२) पोट-नियम (२) मध्ये,—

(क) " करयोग्य मूल्य " या मजकुरानंतर " किंवा, यथास्थिती, भांडवली मूल्य " हा मजकूर समाविष्ट करण्यात येईल ;

(ख) " पंधरा दिवसांच्या " या मजकुराऐवजी " एकवीस दिवसांच्या " हा मजकूर दाखल करण्यात येईल.

सन १९४९ चा मुंबई अधिनियम क्रमांक ५९ याच्या अनुसूची 'घ' मधील प्रकरण आठच्या मधील नियम १८ ची सुधारणा.

३०. कराधान नियमांच्या नियम १८ मधील, पोट-नियम (१) मध्ये, " करयोग्य मूल्याच्या " या मजकुरानंतर " किंवा, यथास्थिती, भांडवली मूल्याच्या " हा मजकूर समाविष्ट करण्यात येईल.

सन १९४९ चा मुंबई अधिनियम क्रमांक ५९ याच्या अनुसूची 'घ' मधील प्रकरण आठच्या मधील नियम १९ ची सुधारणा.

३१. कराधान नियमांच्या नियम १९ मधील, पोट-नियम (१) मध्ये, " करयोग्य मूल्याविरुद्ध " या मजकुरानंतर, " किंवा, यथास्थिती, भांडवली मूल्याविरुद्ध " हा मजकूर समाविष्ट करण्यात येईल.

सन १९४९ चा मुंबई अधिनियम क्रमांक ५९ याच्या अनुसूची 'घ' मधील प्रकरण आठच्या मधील नियम २० ची सुधारणा.

३२. कराधान नियमांच्या नियम २० मधील,—

(१) पोट-नियम (१) मधील खंड (ग) मध्ये, " करयोग्य मूल्याची " या मजकुरानंतर " किंवा, यथास्थिती, भांडवली मूल्याची " हा मजकूर समाविष्ट करण्यात येईल ;

(२) पोट-नियम (२) मध्ये, " करयोग्य मूल्यात " या मजकुरानंतर, " किंवा, यथास्थिती, भांडवली मूल्यात" हा मजकूर समाविष्ट करण्यात येईल.

सन १९४९ चा मुंबई अधिनियम क्रमांक ५९ यातील अनुसूची 'घ' मधील प्रकरण आठ मधील नियम ३० ची सुधारणा.

३३. कराधान नियमांच्या नियम ३० मध्ये, " प्रत्येक कर हा, " या मजकुरानंतर, " नियम ३९ किंवा ४० किंवा ५५ अन्वये देण्यात आलेल्या बिलामध्ये विनिर्दिष्ट केल्याप्रमाणे, " हा मजकूर जादा दाखल करण्यात येईल.

३४. कराधान नियमांच्या नियम ४१ ऐवजी पुढील नियम दाखल करण्यात येईल :— सन १९४९ चा मुंबई अधिनियम क्रमांक ५९ याच्या अनुसूची 'घ' मधील प्रकरण आठ मध्ये नियम ४१ दाखल करणे.

" ४१. (१) उपरोक्तप्रमाणे दिलेले असेल अशा बिलामध्ये विनिर्दिष्ट केल्याप्रमाणे पहिल्या सहामाही कराची रक्कम, बिल दिल्याच्या दिनांकापासून तीन महिन्यांच्या आत भरावयाची असेल आणि बिलामध्ये विनिर्दिष्ट केल्याप्रमाणे दुसऱ्या सहामाही कराची रक्कम, प्रत्येक वर्षाच्या ३१ डिसेंबरपूर्वी भरावयाची असेल, आणि जर, कराची रक्कम भरण्यास पात्र असलेल्या व्यक्तीने उपरोक्तप्रमाणे आवश्यक असल्याप्रमाणे कराची रक्कम भरली नाही तर, अशी अदत्त कराची रक्कम किंवा त्या रकमेचा भाग यांव्यतिरिक्त, त्याने ज्या दिनांकापर्यंत असा कर भरावयाचा होता, त्या शेवटच्या दिनांकानंतर प्रत्येक महिन्यासाठी किंवा त्याच्या भागासाठी अशा रकमेच्या दोन टक्के इतकी रक्कम, शास्ती म्हणून भरण्यास तो जबाबदार असेल आणि बिलाची पूर्ण रक्कम देईपर्यंत अशी शास्ती भरण्यास तो जबाबदार असण्याचे चालू राहील : बिलाच्या न दिलेल्या रकमेवर शास्ती आकारणे.

२०१० चा महा. १० परंतु मुंबई प्रांतिक महानगरपालिका, नागपूर शहर महानगरपालिका, महाराष्ट्र नगर परिषदा, नगर पंचायती व औद्योगिक नगरी, महाराष्ट्र (नागरी क्षेत्रे) झाडांचे संरक्षण व जतन आणि महाराष्ट्र (मोकळ्या निवासी जागा असलेल्या) इमारतींवरील कर (पुन्हा अधिनियमित केलेला) (सुधारणा) अधिनियम, २००९ (यात यापुढे ज्याचा निर्देश " २००९ चा सुधारणा अधिनियम " असा करण्यात आला आहे) याच्या प्रारंभाच्या दिनांकापूर्वी, या अधिनियमान्वये ज्यासाठी बिल देण्यात आले आहे, असा कोणताही मालमत्ता कर पूर्णपणे किंवा अंशतः अदत्त राहिला असेल, ज्या व्यक्तीने असा कर भरलेला नाही ती व्यक्ती उक्त २००९ च्या सुधारणा अधिनियमाच्या प्रारंभाच्या दिनांकास व दिनांकापासून, या कलमान्वये तरतूद केल्याप्रमाणे, अशा करावरील शास्ती भरण्यास जबाबदार असेल.

(२) बिलामधील अन्य कर किंवा मागणी केलेल्या देय रकमा, बिलात विनिर्दिष्ट केलेल्या दिनांकास न भरल्यास, पोट-कलम (१) च्या तरतुदी, योग्य त्या फेरफारांसह, अशा न भरलेल्या रकमेला लागू होतील.".

३५. कराधान नियमांच्या नियम ४२ मध्ये,— सन १९४९ चा मुंबई अधिनियम क्रमांक ५९ याच्या अनुसूची 'घ' मधील प्रकरण आठच्या नियम ४२ची सुधारणा.

(१) " नियम ४१ अन्वये " या मजकुराने सुरू होणाऱ्या व " पुरेसे कारण दाखविले नाही " या मजकुराने संपणाऱ्या मजकुराऐवजी पुढील मजकूर दाखल करण्यात येईल :—

" ज्या व्यक्तीला बिल देण्यात आले आहे अशा व्यक्तीने या अधिनियमाच्या तरतुदीन्वये आवश्यक असल्याप्रमाणे शास्ती किंवा व्याज अथवा दोन्ही यांसह कर भरला नसेल तर, ती व्यक्ती, त्या कराची रक्कम भरण्यास पात्र असेल ";

(२) पोट-नियम (२) ऐवजी पुढील पोट-नियम दाखल करण्यात येईल :—

" (२) जी व्यक्ती, बिल देण्यात आलेल्या बिलानुसार कर भरण्यास पात्र असेल अशा व्यक्तीने, या अधिनियमाच्या तरतुदीन्वये आवश्यक असल्याप्रमाणे, कर भरला असेल, परंतु कराच्या न भरलेल्या रकमेवर देय असेल त्याप्रमाणे, शास्तीची किंवा व्याजाची अथवा दोन्ही रकमा संपूर्णपणे किंवा अंशतः भरल्या नाहीत तर अशा अदत्त राहिलेल्या रकमेबद्दल, जणू काही अशी रक्कम कराबद्दल येणे असलेली रक्कम आहे असे समजून आयुक्त त्याच रीतीने, अनुसूची 'ह' च्या नमुन्यात, अभिपत्र योग्य त्या फेरफारांसह काढू शकेल." .



सन १९४९ चा मुंबई अधिनियम क्रमांक ५९ याच्या अनुसूचीतील प्रकरण आठच्या नियम ४५ ची सुधारणा.

३६. कराधान नियमांच्या नियम ४५ मध्ये,—

(१) पोट-नियम (१) मध्ये,—

(क) " येणे असलेली रक्कम " या मजकुराऐवजी " येणे असलेली कराची रक्कम, शास्ती किंवा व्याज अथवा दोन्हीं कोणतेही असल्यास, असे येणे असलेली आणि एकत्र भरावयाची रक्कम " हा मजकूर दाखल करण्यात येईल ;

(ख) " पाच दिवसांच्या आत " या मजकुराऐवजी " एकवीस दिवसांच्या आत " हा मजकूर दाखल करण्यात येईल ;

(२) पोट-नियम (२) ऐवजी, पुढील पोट-नियम दाखल करण्यात येईल :—

" (२) असा आदेश मालमत्तेच्या कोणत्याही ठळक जागी व महानगरपालिका कार्यालयाच्या कोणत्याही ठळक जागी लावून, तसेच उक्त मालमत्ता ही राज्य शासनाला महसूल देणारी जमीन असेल तेव्हा, जिल्हाधिकाऱ्यांच्या कार्यालयात लावून उद्घोषित करण्यात येईल. ".

सन १९४९ चा मुंबई अधिनियम क्रमांक ५९ याच्या अनुसूचीतील प्रकरण आठच्या नियम ४७ ची सुधारणा.

३७. कराधान नियमांच्या नियम ४७ मधील पोट-नियम (२) मध्ये, " जाहीर लिलावाने " या मजकुरानंतर " किंवा मोहोरबंद बोली मागवून त्याद्वारे लिलावाने " हा मजकूर समाविष्ट करण्यात येईल.

सन १९४९ चा मुंबई अधिनियम क्रमांक ५९ याच्या अनुसूचीतील प्रकरण आठमधील नियम ५१ दाखल करणे.

३८. कराधान नियमांच्या नियम ५१ ऐवजी पुढील नियम दाखल करण्यात येईल :—

शास्ती फी किंवा वसुलीचा खर्च माफ करता येईल.

" ५१. आयुक्तास, आपल्या स्वेच्छानिर्णयानुसार, नियम ४१ खालील शास्ती, किंवा नियम ५० खालील फी किंवा वसुलीचा खर्च पूर्णतः किंवा अंशतः माफ करता येईल. "

३९. कराधान नियमांच्या नियम ५३ मधील, पोट-नियम (२) मधील, " मात्र कसूरदारावर मागणीची कोणतीही नोटीस बजावण्याची आवश्यकता असणार नाही," हा मजकूर वगळण्यात येईल.

सन १९४९ चा मुंबई अधिनियम क्रमांक ५९ याच्या अनुसूची ' ड ' मधील प्रकरण आठच्या नियम ५३ चे सुधारणा

४०. कराधान नियमांच्या नियम ५५ नंतर पुढील नियम समाविष्ट करण्यात येईल :—

सन १९४९ चा मुंबई अधिनियम क्रमांक ५९ याच्या अनुसूची ' ड ' मधील प्रकरण आठमध्ये नियम ५५ क समाविष्ट करणे

"५५क. या अधिनियमाअन्वये कराची रक्कम किंवा अन्य कोणत्याही देय रकमा भरण्यास पात्र असणाऱ्या कोणत्याही व्यक्तीस, महानगरपालिकेने तिच्या अधिकार क्षेत्रात प्रसृत होणाऱ्या दोन अग्रगण्य वर्तमानपत्रांमध्ये जाहीर नोटीस देऊन त्याबाबतीत विनिर्दिष्ट केलेल्या कोणत्याही बँकेत किंवा कोणत्याही अभिकरणाकडे त्या रकमांचा भरणा करण्याच्या सुविधेचा उपयोग करून घेता येईल ; आणि स्वतःला अशा सुविधेचा उपयोग करून घेणारी व्यक्ती, आयुक्त निर्धारित करील त्याप्रमाणे, अशा बँकेकडे किंवा, यथास्थिति, अभिकरणाकडे त्या संबंधातील अशी फी भरण्यास पात्र असेल.".

मालमत्ता कराची रक्कम भरणे इ. सुविधेसाठी विशेष तरतूद.

४१. कराधान नियमाच्या नियम ५३ मध्ये, " परताव्यासाठी मागणी केली आहे या मजकुराने सुरू होणाऱ्या आणि " पाठविले नाही तर ." या मजकुराने संपणाऱ्या मजकुराऐवजी ," नियम ३९, ४० वा ५५ अन्वये अर्जदाराला सादर करण्यात आलेल्या बिलाची रक्कम देण्यासाठी मूळ पावती किंवा कोणताही वैध पुरावा सोबत नसेल तर," हा मजकूर दाखल करण्यात येईल.

सन १९४९ चा मुंबई अधिनियम क्रमांक ५९ याच्या अनुसूची ' ड ' मधील प्रकरण आठच्या मधील नियम ५३ चे सुधारणा.

४२. प्रांतिक महानगरपालिका अधिनियमाच्या अनुसूची ' घ ' मधील नमुना ' छ ' वगळण्यात येईल.

सन १९४९ चा मुंबई अधिनियम क्रमांक ५९ याच्या अनुसूची ' घ ' मधील नमुना ' छ ' वगळणे.

४३. शंका दूर करण्यासाठी याद्वारे घोषित करण्यात येत आहे की, मालमत्ता कर बसविण्यासाठी आधार म्हणून भाडेवारी मूल्याचा स्वीकार करण्यासाठी, महानगरपालिकेने कलम १२९ च्या पोट-कलम (२) खाली निर्धारित केलेल्या दिनांकाच्या लगतपूर्वीच्या कोणत्याही कालावधीशी संबंधित करयोग्य मूल्याच्या आधारे बसविलेल्या कोणत्याही मालमत्ता कराचे कोणतेही निर्धारण, पुनर्निर्धारण तो बसविणे (शास्ती व व्याज बसविण्यासह) आणि तो वसूल करणे यासंबंधीची सर्व कार्यवाही ही, या अधिनियमात काहीही अंतर्भूत असले तरी, परंतु त्यात अन्यथा स्पष्ट शब्दात तरतूद केली असेल त्याव्यतिरिक्त, जणू काही हा सुधारणा अधिनियम अधिनियमित करण्यात आला नसल्याप्रमाणे, प्रांतिक महानगरपालिका अधिनियमान्वये, सुरू राहील.

शंका दूर करणे.

## प्रकरण तीन

## नागपूर शहर महानगरपालिका अधिनियम, १९४८ याची सुधारणा

सन १९५० चा मध्य प्रांत व वऱ्हाड अधिनियम क्रमांक २ याच्या प्रकरण अकरामध्ये भाग चार मधील उपशीर्षकाची सुधारणा.

**४४.** नागपूर शहर महानगरपालिका अधिनियम, १९४८ (यात यापुढे, या प्रकरणात ज्याचा निर्देश “नागपूर महानगरपालिका अधिनियम” असा करण्यात आला आहे) याच्या प्रकरण अकरामध्ये भाग चार मधील उपशीर्षकामधील “मालमत्ता कर बसवणे” या मजकुराऐवजी मालमत्ता कर वार्षिक-मूल्य किंवा भांडवली मूल्य यावर बसवावयाचा मालमत्ता कर बसवणे हा मजकूर दाखल करण्यात येईल. सन १९५० चा मध्यप्रांत व वऱ्हाड २.

सन १९५० चा मध्यप्रांत व वऱ्हाड अधिनियम क्रमांक २ यामध्ये कलम ११५-एक समाविष्ट करणे.

**४५.** नागपूर महानगरपालिका अधिनियमाच्या प्रकरण अकरा मध्ये, “मालमत्ता कर-वार्षिक मूल्य किंवा भांडवली मूल्य यांवर बसवावयाचा मालमत्ता कर बसविणे” या उपशीर्षकानंतर पुढील कलम समाविष्ट करण्यात येईल :—

मालमत्ता करात कोणत्या करांचा समावेश होतो.

“**११५-एक.** (१) या अधिनियमान्वये शहरातील इमारती व जमिनी यांवर बसवावयाच्या मालमत्ता करात मलनिःस्सारण कर, मलनिःस्सारण लाभ कर, पाणीपट्टी, पाणी लाभ कर, सर्वसाधारण कर, पथकर व शिक्षण उपकर, यांचा समावेश होईल.

(२) मालमत्ता कर बसविण्याच्या प्रयोजनासाठी “इमारत” या शब्दप्रयोगामध्ये, सदनिका, गाळा, युनिट किंवा इमारतीचा कोणताही भाग यांचा समावेश होतो.

(३) सर्व किंवा कोणतेही मालमत्ता कर क्रमशः वाढत्या प्रमाणात लादता येतील.

(४) या अधिनियमात अन्यथा तरतूद केली असेल त्याव्यतिरिक्त महानगरपालिका, कलम ११५क च्या पोट-कलम (२) अन्वये इमारतींवर व जमिनींवर त्यांच्या भांडवली मूल्याच्या आधारे कोणतेही किंवा सर्व मालमत्ता कर बसविण्याच्या पद्धतीचा स्वीकार करेपर्यंत, अशा इमारतींच्या व जमिनींच्या वार्षिक मूल्यावर सर्व किंवा कोणतेही मालमत्ता कर बसविणे महानगरपालिकेने चालू ठेवणे कायदेशीर असेल.”.

सन १९५० चा मध्यप्रांत व वऱ्हाड अधिनियम क्रमांक २ याच्या कलम ११५क ची सुधारणा.

**४६.** नागपूर महानगरपालिका अधिनियमाच्या कलम ११५ क मध्ये,—

(१) विद्यमान समासटीपेऐवजी, पुढील समासटीप दाखल करण्यात येईल :—

“वार्षिक मूल्यावर किंवा, यथास्थिति, भांडवली मूल्यावर बसवावयाचे मालमत्ता कर आणि ज्या दराने तो बसवावयाचा असा दर.” ;

(२) नागपूर महानगरपालिका अधिनियमाच्या कलम ११५क ला त्याचा पोट-कलम (१) असा नवीन क्रमांक देण्यात येईल; आणि

(क) अशा प्रकारे नवीन क्रमांक देण्यात आलेल्या पोट-कलम (१) मध्ये,—

(एक) “व त्यांना ‘मालमत्ता कर’ असे संबोधण्यात येईल” हा मजकूर वगळण्यात येईल ;

(दोन) खंड (क) मधील, उपखंड (एक) आणि (दोन) मध्ये, “वार्षिक मूल्याच्या” या मजकुरानंतर, “किंवा यथास्थिति, त्यांच्या भांडवली मूल्याच्या” हा मजकूर समाविष्ट करण्यात येईल;

(तीन) खंड (ख) मधील, उपखंड (एक) आणि (दोन) मध्ये, " वार्षिक मूल्याच्या " या मजकुरानंतर, " किंवा, यथास्थिति, त्यांच्या भांडवली मूल्याच्या " हा मजकूर समाविष्ट करण्यात येईल ;

(चार) खंड (ग) मध्ये, " वार्षिक मूल्यांकनाच्या बारा टक्क्यांहून कमी नसेल " या मजकुराऐवजी " वार्षिक मूल्याच्या बारा टक्क्यांहून कमी नसेल किंवा, यथास्थिति, भांडवली मूल्याच्या ०.१ टक्क्याहून कमी नाही आणि १ टक्क्याहून अधिक नसेल, " हा मजकूर दाखल करण्यात येईल ;

(पाच) परंतुक वगळण्यात येईल ;

(ख) अशा प्रकारे नवीन क्रमांक देण्यात आलेल्या पोट-कलम (१) नंतर, पुढील पोट-कलम जादा दाखल करण्यात येईल :—

" (२) या अधिनियमाच्या अन्य कोणत्याही तरतुदींमध्ये काहीही अंतर्भूत असले तरी, महानगरपालिकेला शहरातील या अधिनियमाच्या तरतुदींनुसार निर्धारित करता येईल अशा दरांनी व अशा दिनांकास आणि त्या दिनांकापासून इमारतींच्या व जमिनींच्या भांडवली मूल्यांच्या आधारे शहरातील इमारतींवर व जमिनींवर मालमत्ता कर बसविण्याची पद्धत स्वीकारण्याचा ठराव संमत करता येईल :

परंतु, ज्या दिनांकापासून भांडवली मूल्यावर असा मालमत्ता कर बसविण्यात आला असेल अशा दिनांकापासून पाच वर्षांच्या कालावधीसाठी, असा कर,—

(एक) निवासी प्रयोजनांसाठी वापरण्यात येणाऱ्या इमारतींच्या बाबतीत, अशा दिनांकाच्या लगतपूर्वीच्या वर्षामध्ये त्यांच्याबाबतीत बसवावयाच्या मालमत्ता कराच्या रकमेच्या दुप्पट रकमेपेक्षा अधिक असणार नाही ; आणि

(दोन) अनिवासी प्रयोजनांसाठी वापरण्यात येणाऱ्या इमारतींच्या किंवा जमिनींच्या बाबतीत, अशा दिनांकाच्या लगतपूर्वीच्या वर्षामध्ये त्यांच्याबाबतीत बसवावयाच्या मालमत्ता कराच्या रकमेच्या तिप्पट रकमेपेक्षा अधिक असणार नाही :

परंतु, आणखी असे की, कलम ११९ च्या पोट-कलम (२) अन्वये सुधारित केलेल्या कोणत्याही इमारतींच्या किंवा जमिनींच्या भांडवली मूल्याच्या आधारे बसवलेला मालमत्ता कर हा, काहीही झाले तरी, अशा सुधारणा केलेल्या वर्षाच्या लगतपूर्वीच्या वर्षामध्ये देय असलेल्या मालमत्ता कराच्या चाळीस टक्के इतक्या रकमेहून अधिक असणार नाही :

परंतु तसेच, या पोट-कलमान्वये, भांडवली मूल्य हा आधार समजून मालमत्ता कर बसविण्याचा स्वीकार केल्याच्या वर्षापासून सुरू होणाऱ्या पाच वर्षांच्या कालावधीकरिता ४६.४५ चौरस मीटर (५०० चौरस फूट) किंवा त्यापेक्षा कमी चटई क्षेत्र असलेल्या निवासी इमारतींच्या किंवा निवासी गाळ्याच्या संबंधात बसवावयाची मालमत्ता कराची रक्कम , भांडवली मूल्य हा आधार समजून मालमत्ता कर बसविण्याचा स्वीकार केल्याच्या वर्षाच्या लगतपूर्वीच्या वर्षामध्ये बसविलेल्या व देय असलेल्या मालमत्ता कराच्या रकमेपेक्षा अधिक असणार नाही :

**स्पष्टीकरण.**—या कलमाच्या प्रयोजनांसाठी, महानगरपालिकेने भांडवली मूल्य हा आधार समजून मालमत्ता कर बसविण्याचा स्वीकार केल्यानंतर कोणत्याही करयोग्य इमारतींच्या संबंधातील मालमत्ता करामध्ये प्रत्येक पाच वर्षानंतर सुधारणा करण्यात येईल आणि अशा प्रत्येक सुधारणेनंतर, अशी मालमत्ता कराची रक्कम कोणत्याही बाबतीत, सुधारणा केल्याच्या वर्षाच्या लगतपूर्वीच्या वर्षामध्ये, बसविलेल्या व देय असलेल्या मालमत्ता कराच्या रकमेच्या चाळीस टक्क्यांहून अधिक असणार नाही.".

सन १९५० चा मध्यप्रांत व वऱ्हाड अधिनियम क्रमांक २ याच्या कलम ११६ ची सुधारणा.

४७. नागपूर महानगरपालिका अधिनियमाच्या कलम ११६ मध्ये, पोट-कलम (४) मधील, " वार्षिक मूल्यांकनाचे " या मजकुरानंतर, " किंवा, यथास्थिति, भांडवली मूल्यांकनाचे " हा मजकूर समाविष्ट करण्यात येईल.

सन १९५० चा मध्यप्रांत व वऱ्हाड अधिनियम क्रमांक २ याच्या कलम ११७ ची सुधारणा.

४८. नागपूर महानगरपालिका अधिनियमाच्या कलम ११७ मध्ये,—

(१) पोट-कलम (१) मध्ये, " पोट-कलम (२)" या मजकुराऐवजी, " पोट-कलम (२), (२क) " हा मजकूर दाखल करण्यात येईल ;

(२) पोट-कलम (२) नंतर, पुढील पोट-कलम समाविष्ट करण्यात येईल :—

"(२क) महानगरपालिकेने इमारतींच्या व जमिनींच्या भांडवली मूल्यावर मालमत्ता कर बसविण्याच्या स्वीकार केला असेल तर, शासनाकडे निहित असलेल्या व किफायतशीररीत्या भोगवट्यात असलेल्या शहरातील ज्या इमारतींच्या व जमिनींच्या संबंधात उक्त माफी दिली गेली नसती तर, राज्य शासनाकडून सर्वसाधारण कर बसविण्यात आला असता, त्याबाबतीत त्या इमारतींचे व जमिनींचे भांडवली मूल्य हे शासकीय अभिलेखामधील अशा जमिनींच्या किंवा इमारतींच्या पुस्तक मूल्याइतके असेल, आणि असे भांडवली मूल्य पाच वर्षांच्या मुदतीकरिता अंमलात राहील ; मात्र दरम्यान, शासनाकडे निहित असलेल्या शहरातील इमारतींची व जमिनींची संख्या किंवा व्याप्ती यात मोठ्या प्रमाणात वाढ किंवा घट झाली तर त्या वाढीच्या किंवा घटीच्या प्रमाणात अशा मूल्यात बदल होईल. ";

(३) पोट-कलम (३) मध्ये, " पोट-कलम अस्तित्वात नसते तर " या मजकुरानंतर, पुढील मजकूर जादा दाखल करण्यात येईल :—

" पोट-कलम (२) अन्वये, वार्षिक मूल्याच्या आधारे किंवा, यथास्थिति,पोट-कलम (२क) अन्वये, भांडवली मूल्याच्या आधारे. ".

सन १९५० चा मध्यप्रांत व वऱ्हाड अधिनियम क्रमांक २ याच्या कलम ११९ ची सुधारणा.

४९. नागपूर महानगरपालिका अधिनियमाच्या कलम ११९ मध्ये,—

(१) समासटीपेमध्ये, " वार्षिक मूल्य " या मजकुरानंतर, " किंवा, यथास्थिति, भांडवली मूल्य " हा मजकूर समाविष्ट करण्यात येईल ;

(२) " मालमत्ता कर आकारण्याच्या प्रयोजनांसाठी " या मजकुरानंतर, " पुढीलप्रमाणे वार्षिक मूल्य किंवा, यथास्थिति, भांडवली मूल्य निर्धारित करण्यात येईल " हा मजकूर जादा दाखल करण्यात येईल ;

(३) विद्यमान खंड (क) (ख) व (ग) यांना, कलम ११९ चा खंड (क) असा नवीन क्रमांक देण्यात येईल आणि अशा प्रकारे नवीन क्रमांक देण्यात आलेल्या खंड (क) नंतर, पुढील खंड जादा दाखल करण्यात येईल :—

भांडवली मूल्य कसे निर्धारित करणे.

" (ख) (क) मालमत्ता कर आकारणीयोग्य असलेल्या कोणत्याही इमारतीचे किंवा जमिनीचे भांडवली मूल्य निश्चित करण्यासाठी, आयुक्त, मुंबई मुद्रांक अधिनियम, १९५८ च्या तरतुदी अन्वये तयार केलेले मुंबई मुद्रांक (संपत्तीचे वास्तविक बाजार मूल्य ठरवणे) नियम, १९९५ अन्वये, तयार केलेल्या व त्या त्या वेळी अंमलात असलेल्या मुद्रांक शुल्क सिद्धगणकामध्ये दर्शविलेले कोणत्याही इमारतीचे किंवा जमिनीचे मूल्य लक्षात घेईल अथवा जिचे भांडवली मूल्य निर्धारित करणे आवश्यक आहे अशी इमारत किंवा जमीन ज्या क्षेत्रातील असेल अशा कोणत्याही विशिष्ट क्षेत्रातील कोणत्याही मालमत्तेचे मूल्य मुद्रांक शुल्क सिद्धगणकामध्ये दाखविण्यात आले नसेल तर किंवा एखाद्यावेळी असे मुद्रांक शुल्क सिद्धगणक अस्तित्वात आले नसेल तर त्याबाबतीत आयुक्तास, अशा इमारतीचे किंवा जमिनीचे बाजार मूल्य आधार मूल्य म्हणून, विचारात घेऊन, तसेच पुढील घटक देखील विचारात घेऊन तिचे भांडवली मूल्य निश्चित करता येईल :—

१९५८ चा मुंबई ६०.

(एक) जमिनीचे स्वरूप व प्रकार आणि इमारतीची संरचना,

(दोन) जमिनीचे क्षेत्र किंवा इमारतीचे चटई क्षेत्र,

(तीन) वापरकर्ता प्रवर्ग म्हणजे (एक) निवासी, (दोन) वाणिज्यिक (दुकाने किंवा तत्सम), (तीन) कार्यालये, (चार) हॉटेले (चार तारांकितपर्यंत), (पाच) हॉटेले (चार तारांकितपेक्षा अधिक), (सहा) बँका, (सात) उद्योग व कारखाने, (आठ) शालेय व महाविद्यालयीन इमारत किंवा शैक्षणिक प्रयोजनांसाठी वापरण्यात येणारी इमारत, (नऊ) मॉल आणि (दहा) वरीलपैकी कोणत्याही प्रवर्गामध्ये समाविष्ट नसलेली अन्य कोणतीही इमारत किंवा जमीन,

(चार) इमारत किती वर्षे जुनी आहे, किंवा

(पाच) पोट-कलम (ख) अन्वये केलेल्या विनियमांद्वारे विनिर्दिष्ट करण्यात येतील असे अन्य काही घटक.

(ख) आयुक्त, पोट-कलम (क) अन्वये भांडवली मूल्य निश्चित करण्याच्या प्रयोजनाकरिता स्थायी समितीच्या मान्यतेने, इमारतींच्या किंवा जमिनींच्या प्रवर्गांमध्ये तपशिलांच्या बाबतीत आणि अशा विविध प्रवर्गांना नेमून द्यावयाच्या वहुविध भारांकाच्या बाबतीत विनियम तयार करील ;

(ग) कोणत्याही इमारतीचे किंवा जमिनीचे पोट-कलम (क) अन्वये निश्चित केलेले भांडवली मूल्य दर पाच वर्षांनी सुधारित करता येईल :

परंतु, आयुक्तास, कारणे लेखी नमूद करून, उक्त पाच वर्षांच्या कालावधीत, कोणत्याही वेळी, कोणत्याही इमारतीचे किंवा जमिनीचे भांडवली मूल्य सुधारित करता येईल आणि तदनुसार, तो, कलम १३४ अन्वये, अशा इमारतींच्या किंवा जमिनींच्या संबंधात, निर्धारण यादीत सुधारणा करील. ".

५०. नागपूर महानगरपालिका अधिनियमाच्या कलम १२१ मध्ये, " मालमत्ता करांच्या प्रयोजनांसाठी " या मजकुराऐवजी, " वार्षिक मूल्य किंवा, यथास्थिति, भांडवली मूल्य निर्धारित करण्याच्या आणि मालमत्ता कर बसविण्याच्या प्रयोजनांसाठी " हा मजकूर दाखल करण्यात येईल. सन १९५० चा मध्यप्रांत व वऱ्हाड अधिनियम क्रमांक २ याच्या कलम १२१ ची सुधारणा.

५१. नागपूर महानगरपालिका अधिनियमाच्या कलम १२२ ऐवजी पुढील कलम दाखल करण्यात येईल :— सन १९५० चा मध्यप्रांत व वऱ्हाड अधिनियम क्रमांक २ याच्या कलम १२२ ची सुधारणा.

" १२२. (१) पोट-कलम (२) च्या तरतुदींच्या अधीन राहून, कोणत्याही जागेवर निर्धारित केलेले मालमत्ता कर हे, प्राथमिकपणे पुढीलप्रमाणे बसविण्याजोगे असतील :— मालमत्ता कर भरण्याची प्राथमिक जबाबदारी कोणाची असावयाची.

(क) जर जागा ही, शासनाकडून किंवा महानगरपालिकेकडून, तिच्या प्रत्यक्ष भोगवटादाराकडून तत्काळ धारण करण्यात आली असेल तर तिच्याकडून :

परंतु, शासनाकडे विहित असलेल्या व भाडेतत्त्वावर शासकीय कर्मचाऱ्यांच्या किंवा अन्य व्यक्तींच्या ताब्यात असलेल्या इमारतींच्या बाबतीतील अदत्त मालमत्ता कर हे, प्राथमिकपणे शासनाकडून बसविण्याजोगे असतील ;

(ख) जो मालक नाही अशा व्यक्तीने जागा धारण केली असेल किंवा ती तिचा भोगवटा करीत असेल आणि जागेच्या मालकाचा ठावठिकाणा निश्चित माहीत नसेल तर अशा धारकाकडून किंवा भोगवटादाराकडून ; आणि

(ग) विकासकाने किंवा मुखत्याराने अथवा कोणत्याही व्यक्तीने जागा धारण केली असेल किंवा तिचा विकास केला असेल—मग अशा व्यक्तीने कोणत्याही नात्याने ती जागा धारण केली असेल आणि त्यापैकी प्रत्येकाला त्या जागेची विक्री करण्याचा अधिकार असेल-किंवा तिने ती संपादित केला असेल तर अशा धारकाकडून, विकासकाकडून, मुखत्याराकडून किंवा यथास्थिति, त्या व्यक्तीकडून :

परंतु, असा धारक, विकासक, मुखत्यार किंवा व्यक्ती प्रत्यक्ष विक्री होईपर्यंतच असा कर वसूल केला जाण्यास पात्र असेल :

(घ) जागा पुढीलप्रमाणे धारण करण्यात आल्या नसतील तर,—

(एक) जागा भाड्याने देण्यात आल्या असतील तर, तिच्या पट्टाकाराकडून ;

(दोन) जागा पोट भाड्याने देण्यात आल्या असतील तर, तिच्या वरिष्ठ पट्टकाराकडून ;

(तीन) जर जागा पट्ट्याने देण्यात आल्या नसतील तर, निहित असलेल्या जागा भाड्याने देण्याचा हक्क दिला असेल अशा व्यक्तीकडून.

(२) कोणतीही जमीन, एका वर्षापेक्षा अधिक अशा कोणत्याही मुदतीकरिता, एखाद्या भाडेकरूस पट्ट्याने दिली असेल व अशा भाडेकरूने जमिनीवर इमारतीचे बांधकाम केले असेल तर, उक्त जमिनीवरील व स्थावर उभारण्यात असलेल्या इमारतीवरील निर्धारित केलेला मालमत्ता कर हा प्रमुख्याने उक्त भाडेकरूकडून किंवा ज्या व्यक्तीला पोट-भाडेपट्ट्याने नव्हे तर कायद्यानुसार किंवा अभिहस्तांकनाद्वारे किंवा हस्तांतरणाद्वारे उक्त भाडेकरूकडून मालकी हक्क मिळालेले आहेत अशा कोणत्याही व्यक्तीकडून किंवा उक्त भाडेकरूच्या कायदेशीर प्रतिनिधीकडून किंवा व्यक्तीकडून मग अशी जागा, उक्त भाडेकरूच्या किंवा व्यक्तीच्या किंवा तिच्या कायदेशीर प्रतिनिधीच्या किंवा पोट-भाडेकरूच्या ताब्यात असो किंवा नसो प्राथमिकपणे वसूल करण्याजोगा असेल. ".

सन १९५० चा मध्यप्रांत व वऱ्हाड अधिनियम क्रमांक २ याच्या कलम १२३ ची सुधारणा.

५२. नागपूर महानगरपालिका अधिनियमाच्या कलम १२३ मधील पोट-कलम (१) मध्ये, " वार्षिक मूल्य " या मजकुरानंतर " किंवा, यथास्थिति, भांडवली मूल्य " हा मजकूर समाविष्ट करण्यात येईल.

सन १९५० चा मध्यप्रांत व वऱ्हाड अधिनियम क्रमांक २ याच्या कलम १२४ ची सुधारणा.

५३. नागपूर महानगरपालिका अधिनियमाच्या कलम १२४ मध्ये,—

(१) समासटीपेतील " वार्षिक मूल्याचे " या मजकुरानंतर, " किंवा भांडवली मूल्याचे " हा मजकूर समाविष्ट करण्यात येईल.

(२) पोट-कलम (१) नंतर, पुढील पोट-कलम समाविष्ट करण्यात येईल :—

" (१क) कलम ११५क च्या पोट-कलम (२) अन्वये महानगरपालिकेने मालमत्ता करांचे निर्धारण करणे आणि ते बसविणे यांकरिता आधार म्हणून, भांडवली मूल्याच्या स्वीकार केल्याच्या दिनांकास व त्या दिनांकापासून या अधिनियमाच्या तरतुदींनुसार निश्चित केलेल्या भांडवली

मूल्याच्या आधारे केलेले निर्धारण व त्याचा अवधी यांचे, भांडवली मूल्य निश्चित करण्याच्या संबंधातील तरतुदींनुसार नियमन करण्यात येईल आणि त्याच्या आधारे मालमत्ता करांचे निर्धारण करण्यात येईल. ”.

५४. नागपूर महानगरपालिका अधिनियमाच्या कलम १२५च्या पोट-कलम (१) मध्ये.— सन १९५० चा मध्यप्रांत व वऱ्हाड अधिनियम क्रमांक २ याच्या कलम १२५ ची सुधारणा.

(१) खंड (क) मधील शेवटी आलेला “ आणि ” हा शब्द वगळण्यात येईल ;

(२) खंड (ख) मधील “ अंदाजे बाजार मूल्य ” या मजकुराऐवजी “ अंदाजे बाजार मूल्य , आणि ” हा मजकूर दाखल करण्यात येईल ,

(३) खंड (ख) नंतर पुढील खंड जादा दाखल करण्यात येईल :—

“ (ग) अशा जमिनीच्या किंवा इमारतीच्या किंवा त्यांच्या कोणत्याही भागाच्या संबंधात कलम ११९ च्या खंड (ख) च्या उप-खंड (क) च्या (एक) ते (पाच) मध्ये नमूद करण्यात आलेल्या कोणत्याही किंवा सर्व घटकांच्या बाबतीतील तपशिलांचे वर्णन. ”.

५५. नागपूर महानगरपालिका अधिनियमाच्या कलम १२६ मधील,— सन १९५० चा मध्यप्रांत व वऱ्हाड अधिनियम क्रमांक २ याच्या कलम १२६ ची सुधारणा.

(१) पोट-कलम (१) मध्ये “ कलम १२४ खालील ” या मजकुरानंतर “ वार्षिक मूल्य किंवा, यथास्थिती, भांडवली मूल्य म्हणून ” हा मजकूर समाविष्ट करण्यात येईल ;

(२) पोट-कलम (२) मध्ये “ वार्षिक मूल्याच्या ” या मजकुरानंतर “ किंवा, यथास्थिति, भांडवली मूल्याच्या ” हा मजकूर समाविष्ट करण्यात येईल.

५६. नागपूर महानगरपालिका अधिनियमाच्या कलम १२८ मध्ये, “ कलम १२४ खाली ” या मजकुरानंतर, “ किंवा कलम ११९ च्या खंड (ख), च्या उप खंड (ग) च्या परंतुकाखाली ” हा मजकूर समाविष्ट करण्यात येईल. सन १९५० चा मध्यप्रांत व वऱ्हाड अधिनियम क्रमांक २ याच्या कलम १२८ ची सुधारणा

५७. नागपूर महानगरपालिका अधिनियमाच्या कलम १३० मधील.— सन १९५० चा मध्यप्रांत व वऱ्हाड अधिनियम क्रमांक २ याच्या कलम १३० ची सुधारणा.

(१) पोट-कलम (३) मधील “ भारतीय ” हा शब्द वगळण्यात येईल ;

(२) पोट-कलम (५) ऐवजी पुढील पोट-कलम दाखल करण्यात येईल :—

“ (५) जिल्हा न्यायालयाच्या निर्णय अंतिम नसेल तेव्हा, जिल्हा न्यायालयाच्या अंतिम निर्णयाविरुद्ध अपील करण्याची किंवा त्याचे पुनरिक्षण करण्याची तरतूद असलेल्या कलम ३८८ च्या तरतुदींच्या आधारे व या तरतुदींनुसार, जर अपील किंवा पुनरिक्षण दाखल करण्यात आले असेल व ते प्रलंबित असेल तर, या अधिनियमामध्ये काहीही अंतर्भूत असले तरी, मात्र पोट-कलम (१) च्या तरतुदींना अधीन राहून, आयुक्ताने वर्षावर्षाला या अधिनियमाच्या तरतुदींअन्वये निर्धारित केलेल्या, वार्षिक मूल्याच्या किंवा, यथास्थिति, भांडवली मूल्याच्या आधारे मालमत्ता करांचे निर्धारण करणे, हे कायदेशीर असेल. ”.

५८. नागपूर महानगरपालिका अधिनियमाच्या कलम १३२ मधील, पोट-कलम (१) मधील “ वार्षिक मूल्यांची ” या मजकुरानंतर, “ किंवा, यथास्थिति, भांडवली मूल्यांची ” हा मजकूर समाविष्ट करण्यात येईल. सन १९५० चा मध्यप्रांत व वऱ्हाड अधिनियम क्रमांक २ याच्या कलम १३२ ची सुधारणा.

५९. नागपूर महानगरपालिका अधिनियमाच्या कलम १३३ मधील, पोट-कलम (१) मधील “ वार्षिक मूल्यांमध्ये ” या मजकुरानंतर, “ किंवा, यथास्थिति, भांडवली मूल्यांमध्ये ” हा मजकूर समाविष्ट करण्यात येईल. सन १९५० चा मध्यप्रांत व वऱ्हाड अधिनियम क्रमांक २ याच्या कलम १३३ ची सुधारणा.

सन १९५० चा मध्यप्रांत व वऱ्हाड अधिनियम क्रमांक २ याच्या कलम १३४ ची सुधारणा.

**६०.** नागपूर महानगरपालिका अधिनियमाच्या कलम १३४ मधील, पोट-कलम (१) मधील, " परंतु आणखी असे की, " या मजकुरानंतर, " मात्र कलम १३० च्या पोट-कलम (५) मध्ये तरतूद केली असेल ती खेरीज करून " हा मजकूर समाविष्ट करण्यात येईल.

सन १९५० चा मध्यप्रांत व वऱ्हाड अधिनियम क्रमांक २ याच्या कलम १३८ ची सुधारणा.

**६१.** नागपूर महानगरपालिका अधिनियमाच्या कलम १३८ मधील, " कलम १३० खाली अपील दाखल करण्यात आल्यामुळे " या मजकुरानंतर, " किंवा ३८८ खाली अपील किंवा पुनरीक्षण दाखल करण्यात आल्यामुळे " हा मजकूर समाविष्ट करण्यात येईल.

सन १९५० चा मध्यप्रांत व वऱ्हाड अधिनियम क्रमांक २ याचे कलम १३९ वगळणे.

**६२.** नागपूर महानगरपालिका अधिनियमाचे कलम १३९ वगळण्यात येईल.

सन १९५० चा मध्यप्रांत व वऱ्हाड अधिनियम क्रमांक २ याच्या कलम १४३ ची सुधारणा.

**६३.** नागपूर महानगरपालिका अधिनियमाच्या कलम १४३ मधील पोट-कलम (२) मध्ये, " कलम ११६ " या मजकुरानंतर " आणि कलम ११८ क " हा मजकूर समाविष्ट करण्यात येईल.

सन १९५० चा मध्यप्रांत व वऱ्हाड अधिनियम क्रमांक २ याच्या कलम १४५ ची सुधारणा.

**६४.** नागपूर महानगरपालिका अधिनियमाच्या कलम १४५ मधील, पोट-कलम (१) मध्ये " तरतुदीअन्वये " या मजकुरानंतर " वार्षिक मूल्याच्या आधारे " हा मजकूर समाविष्ट करण्यात येईल.

सन १९५० चा मध्यप्रांत व वऱ्हाड अधिनियम क्रमांक २ यात कलम १४७क समाविष्ट करणे.

**६५.** नागपूर महानगरपालिका अधिनियमाच्या कलम १४७ नंतर पुढील कलम समाविष्ट करण्यात येईल.

नवीन इमारत, इत्यादी उभारण्याबाबतची नोटीस आयुक्तास देणे.

" **१४७ क.** (१) जेव्हा कोणतीही नवीन इमारत उभारण्यात येत असेल किंवा कोणत्याही इमारतीचे पुनर्बांधकाम करण्यात येत असेल किंवा ती वाढविण्यात येत असेल किंवा तिचा भोगवटा करण्यात येत असेल किंवा पुन्हा भोगवटा करण्यात येत असेल किंवा त्या संपूर्ण इमारतीच्या किंवा तिच्या भागाच्या वापरकर्त्यामध्ये बदल करण्यात येत असेल तेव्हा ; इमारतीवर निर्धारित केलेले मालमत्ता कर देण्यास प्रथमतः पात्र असलेली व्यक्ती त्याबाबतची लेखी नोटीस पंधरा दिवसांच्या आत आयुक्तास देईल.

(२) उक्त पंधरा दिवसांचा कालावधी हा, जी इमारत नव्याने उभारण्यात आली असेल किंवा तिचे पुनर्बांधकाम करण्यात आले असेल, किंवा ती इमारत वाढविण्यात आली असेल किंवा तिचा पुन्हा भोगवटा करण्यात आला असेल किंवा, यथास्थिती, संपूर्ण इमारतीच्या किंवा, तिच्या भागाच्या वापरकर्त्यामध्ये बदल करण्यात आला असेल अशा इमारतीचे बांधकाम पूर्ण होण्याच्या किंवा भोगवटा करण्यात आल्याच्या दिनांकापासून, यापैकी जे प्रथम घडेल, त्या कालावधीपासून मोजण्यात येईल. ".

सन १९५० चा मध्यप्रांत व वऱ्हाड अधिनियम क्रमांक २ याच्या कलम १४८ ची सुधारणा.

**६६.** नागपूर शहर महानगरपालिका अधिनियमाच्या कलम १४८ मधील, पोट-कलम (३) नंतर, पुढील पोट-कलमे समाविष्ट करण्यात येतील :—

"(३ क) नोटिशीसोबत, स्थायी समितीच्या मान्यतेने आयुक्त, वेळोवेळी विहित करील अशी फी जोडण्यात येईल ; आणि अशा नोटिशीमध्ये जमिनीच्या किंवा इमारतीच्या हस्तांतरणाचे तपशील स्पष्टपणे व अचूकपणे नमूद करील.

(३ख) हस्तांतरित करावयाच्या मालमत्तेच्या संबंधात देय असलेला मालमत्ता कर, अशी नोटीस देण्यापूर्वी पूर्णपणे भरण्यात आला नसेल तर, आयुक्त, मालमत्ता कर देण्यास प्रथमतः पात्र असलेल्या कोणत्याही व्यक्तींच्या हक्काच्या हस्तांतरणाची नोंद निर्धारण यादीमध्ये घेणार नाही. ".

६७. नागपूर महानगरपालिका अधिनियमाच्या कलम १५३क मधील, पोट-कलम (१) मध्ये " करयोग्य मूल्याच्या " व " करयोग्य मूल्य " हा मजकूर जेथे जेथे आला असेल तेथे तेथे त्या मजकुराऐवजी अनुक्रमे " वार्षिक मूल्याच्या किंवा, यथास्थिति, भांडवली मूल्याच्या " व " वार्षिक मूल्य किंवा, यथास्थिति, भांडवली मूल्य " हा मजकूर दाखल करण्यात येईल.

सन १९५० चा मध्यप्रांत व वऱ्हाड अधिनियम क्रमांक २ याच्या कलम १५३क ची सुधारणा.

६८. नागपूर महानगरपालिका अधिनियमाच्या कलम १५३ख मधील, पोट-कलम (१) मध्ये,---

(१) " करयोग्य मूल्याच्या " व " करयोग्य मूल्य " हा मजकूर जेथे जेथे आला असेल तेथे तेथे त्या मजकुराऐवजी अनुक्रमे " वार्षिक मूल्याच्या किंवा, यथास्थिति, भांडवली मूल्याच्या " व " वार्षिक मूल्य किंवा, यथास्थिति, भांडवली मूल्य " हा मजकूर दाखल करण्यात येईल ;

(२) " महानगरपालिका तसे निश्चित करील तर असा कर क्रमवर्धी प्रमाणात बसविता येईल " हा मजकूर वगळण्यात येईल.

सन १९५० चा मध्यप्रांत व वऱ्हाड अधिनियम क्रमांक २ याच्या कलम १५३ख ची सुधारणा.

६९. नागपूर महानगरपालिका अधिनियमाच्या कलम १५३ग च्या पोट-कलम (२) मध्ये,—

(१) " करयोग्य मूल्यावर " या मजकुराऐवजी " वार्षिक मूल्यावर किंवा, यथास्थिति, भांडवली मूल्यावर " हा मजकूर दाखल करण्यात येईल ;

(२) " पोट-कलम (२) " या मजकुरानंतर " किंवा पोट-कलम (२क) " हा मजकूर दाखल करण्यात येईल.

सन १९५० चा मध्यप्रांत व वऱ्हाड अधिनियम क्रमांक २ याच्या कलम १५३ग ची सुधारणा.

७०. नागपूर महानगरपालिका अधिनियमाच्या कलम १५४ मध्ये,—

(१) समासटीपेतील " मागण्या " या मजकुराऐवजी " देय रकमा " हा मजकूर दाखल करण्यात येईल ;

(२) पोट-कलम (१) नंतर, पुढील पोट-कलम समाविष्ट करण्यात येईल :—

" (१क) प्रत्येक मालमत्ता कर हा, सहामाही हप्त्यांमध्ये आगाऊ भरावा लागेल आणि इतर कर व देय रकमादेखील पोट-कलम (१) खाली सादर केलेल्या किंवा देण्यात आलेल्या बिलामध्ये विनिर्दिष्ट केलेल्या दिनांकास देय असतील. ";

(३) पोट-कलम (२) नंतर पुढील पोट-कलम जादा दाखल करण्यात येईल :—

सन १९५० चा मध्यप्रांत व वऱ्हाड अधिनियम क्रमांक २ याच्या कलम १५४ ची सुधारणा.

" (३) (क) उपरोक्तप्रमाणे दिलेले असेल अशा बिलामध्ये विनिर्दिष्ट केल्याप्रमाणे पहिल्या सहामाही कराची रक्कम, बील दिल्याच्या दिनांकापासून तीन महिन्यांच्या आत भरावयाची असेल आणि बिलामध्ये विनिर्दिष्ट केल्याप्रमाणे दुसऱ्या सहामाही कराची रक्कम, प्रत्येक वर्षाच्या ३१ डिसेंबर पूर्वी भरावयाची असेल ; आणि जर, कराची रक्कम भरण्यास पात्र असलेल्या व्यक्तीने उपरोक्तप्रमाणे आवश्यक असल्याप्रमाणे कराची रक्कम भरली नाही तर, अशी अदत्त कराची रक्कम किंवा त्या रकमेचा भाग याव्यतिरिक्त त्याने ज्या दिनांकापर्यंत असा कर भरावयाचा होता, त्या शेवटच्या दिनांकानंतर, प्रत्येक महिन्यासाठी किंवा त्याच्या भागासाठी, अशा कराच्या दोन टक्के इतकी रक्कम शास्ती म्हणून भरण्यास तो जबाबदार असेल आणि बिलाची पूर्ण रक्कम देईपर्यंत अशी शास्ती भरण्यास तो जबाबदार असण्याचे चालू राहील :

बिलाच्या न दिलेल्या रकमेवर शास्ती बसविणे.

परंतु, मुंबई प्रांतिक महानगरपालिका, नागपूर शहर महानगरपालिका, महाराष्ट्र नगरपरिषदा, नगर पंचायती व औद्योगिक नगरी महाराष्ट्र (नागरी क्षेत्रे) झाडांचे संरक्षण व जतन आणि महाराष्ट्र (मोकळ्या निवासी जागा असलेल्या) इमारतींवरील कर (पुन्हा अधिनियमित केलेला) (सुधारणा) अधिनियम, २००९ (यात यापुढे ज्याचा निर्देश " २००९ चा सुधारणा अधिनियम " असा करण्यात आला आहे) याच्या प्रारंभाच्या दिनांकापूर्वी, या अधिनियमान्वये जर बील देण्यात आले आहे असा कोणताही मालमत्ता कर, अंशतः किंवा पूर्णतः अदत्त राहिला असेल तर, ज्या व्यक्तीने असा कर भरला नसेल ती व्यक्ती, उक्त २००९ च्या सुधारणा अधिनियमाच्या प्रारंभाच्या दिनांकास व तेव्हापासून, या कलमान्वये तरतूद केल्याप्रमाणे, शास्तीची रक्कम भरण्यास पात्र असेल. २०१० चा महा. १०.

(ख) बिलामध्ये अन्य कर किंवा मागणी केलेल्या देय रकमा बिलात विनिर्दिष्ट केलेल्या दिनांकास न भरल्यास, खंड (क) च्या तरतुदी, योग्य त्या फेरफारांसह, अशा न भरलेल्या रकमेला लागू होतील. ".

सन १९५० चा मध्यप्रांत व वऱ्हाड अधिनियम क्रमांक २ यामध्ये कलम १५५ दाखल करणे.

७१. नागपूर महानगरपालिका अधिनियमाच्या कलम १५५ ऐवजी, पुढील कलम दाखल करण्यात येईल :—

भोगवटादारांना मालमत्ता कराची रक्कम भरण्यासाठी किंवा पात्र ठरवता येईल.

" १५५. (१) या अधिनियमान्वये, मालमत्ता कराचा भरणा करण्याकरिता प्रथमतः पात्र असणाऱ्या व्यक्तीला, त्या मालमत्ता कराकरिता एखादे बील यथोचितरीत्या देण्यात आल्यानंतर कोणत्याही मालमत्ता कराच्या बाबतीतील देय असलेली रक्कम, चुकती न करता राहिली असेल आणि उक्त व्यक्ती, देय असलेल्या कराच्या संबंधातील जागांचा त्यावेळी भोगवटादार नसेल तर, आयुक्तास, उक्त जागांच्या भोगवटादारांना त्या रकमेचे बील देता येईल, किंवा त्या जागेचे दोन किंवा त्यापेक्षा अधिक भोगवटादार असतील तर, त्या दोघांनी किंवा उक्त जागांच्या संबंधातील सर्वांनी भरणा केलेल्या भाड्याच्या सरासरी रकमेपोटी अशा भोगवटादाराने भरणा केला असेल अशा भाड्याच्या प्रमाणानुसार देय असलेल्या संपूर्ण रकमेपोटी म्हणून देय रकमेच्या अशा भागाकरिता त्या प्रत्येकावर बील देता येईल.

(२) पोट-कलम (१) मध्ये काहीही अंतर्भूत असले तरी, कलम ११५क च्या पोट-कलम (२) अन्वये मालमत्ता कर बसविण्याकरिता, भांडवली मूल्य हा आधार म्हणून स्वीकार केल्याच्या दिनांकास किंवा दिनांकापासून, परंतु या अधिनियमाच्या इतर तरतुदींस अधीन राहून, आयुक्तास उक्त जागेच्या अशा भोगवटादारावर मालमत्ता कराच्या रकमेकरिता बील देता येईल किंवा, अशा जागेचे दोन किंवा अधिक भोगवटादार असतील तर, त्यापैकी प्रत्येकावर भांडवली मूल्यावर आधारित कराच्या संपूर्ण रकमेसाठी देय असलेल्या रकमेच्या भागाकरिता, उक्त जागेच्या संबंधात भांडवली मूल्यावर आधारित कराच्या एकूण रकमेशी, एक किंवा अनेक भोगवटादारांच्या जागेच्या अशा भागासाठी असलेल्या भांडवली मूल्याच्या, त्याच प्रमाणात देय असलेल्या रकमेकरिता बील देता येईल.

(३) असे कोणतेही बील बजावण्यात आल्यापासून तीस दिवसांच्या आत, भोगवटादाराने किंवा त्यांच्यापैकी कोणीही त्यात हक्कमागणी केलेली रक्कम भरण्यास कसूर केली तर, या अधिनियमाच्या तरतुदींना अनुसरून त्याच्याकडून उक्त रक्कम वसूल करता येईल.

(४) ज्यावर कर निर्धारित केला आहे अशा जागांचा भोगवटा ज्याच्याकडे नव्हता अशा भोगवटादाराकडून कोणत्याही कालावधीच्या बाबतीत असा कर देय असेल तर, या कलमान्वये जो मालक नाही अशा कोणत्याही भोगवटादाराकडून मालमत्ता कराची अशी कोणतीही थकबाकी वसूल करण्यात येणार नाही.

(५) या कलमान्वये, एखाद्या भोगवटादाराने कोणतीही रक्कम भरली असेल किंवा त्याच्याकडून वसूल केली असेल तर, तो, त्या रकमेचा भरणा करण्यास प्रथमतः पात्र असणाऱ्या व्यक्तींच्या खात्यामध्ये ती रक्कम जमा करण्यास हक्कदार असेल.

१५५ क. या अधिनियमान्वये कराची रक्कम किंवा अन्य कोणत्याही देय रकमा भरण्यास पात्र असणाऱ्या कोणत्याही व्यक्तीस, महानगरपालिकेने तिच्या अधिकार क्षेत्रात प्रसृत होणाऱ्या दोन अग्रगण्य वर्तमानपत्रांमध्ये जाहीर नोटीस देऊन त्या बाबतीत विनिर्दिष्ट केलेल्या कोणत्याही बँकेत किंवा कोणत्याही अभिकरणाकडे त्या रकमेचा भरणा करण्याच्या सुविधेचा उपयोग करून घेता येईल; आणि स्वतःला अशा सुविधेचा उपयोग करून घेणारी व्यक्ती, आयुक्त निर्धारित करील त्याप्रमाणे, अशा बँकेकडे किंवा, यथास्थिति, अभिकरणाकडे त्या संबंधातील अशी फी भरण्यास पात्र असेल. ". मालमत्ता कराची रक्कम भरण्याच्या सुविधेसाठी विशेष तरतूद.

७२. नागपूर महानगरपालिका अधिनियमाच्या कलम १५६ मधील पोट-कलम (१) मध्ये,— सन १९५० चा मध्यप्रांत व वऱ्हाड अधिनियम क्रमांक २ याच्या कलम १५६ ची सुधारणा.

(१) " कलम १५५ च्या " या मजकुराने सुरु होणाऱ्या " २१ दिवसांच्या आत " या मजकुराने संपणाऱ्या मजकुराऐवजी, " कलम १५४ च्या पोट-कलम (१) खाली ज्या व्यक्तीला बील देण्यात आले आहे तिने,— " हा मजकूर दाखल करण्यात येईल :

(२) खंड (क) ऐवजी, पुढील खंड दाखल करण्यात येईल :—

" (क) या अधिनियमाच्या तरतुदीअन्वये आवश्यक असेल त्याप्रमाणे शास्ती, व्याज, फी किंवा अन्य कोणत्याही देय रकमा यांसह कराची रक्कम भरली नसेल तर, बिलामध्ये विनिर्दिष्ट केलेल्या दिनांकास किंवा त्या दिनांकापूर्वी ती रक्कम भरणे ; " ;

(३) खंड (ख) वगळण्यात येईल ;

(४) खंड (ग) मध्ये, " मागणी विरुद्ध " या मजकुराऐवजी, " हक्क मागणी विरुद्ध " हा मजकूर दाखल करण्यात येईल.

७३. नागपूर महानगरपालिका अधिनियमाच्या कलम १५७ मध्ये, " कलम १५५ चे पोट-कलम (२) खाली अथवा " हा मजकूर वगळण्यात येईल. सन १९५० चा मध्यप्रांत व वऱ्हाड अधिनियम क्रमांक २ याच्या कलम १५७ ची सुधारणा.

७४. नागपूर महानगरपालिका अधिनियमाच्या कलम १६० मध्ये, पोट-कलम (२) मधील " जाहीर लिलावाने " या मजकुरानंतर, " किंवा मोहोरबंद बोली मागवून त्याद्वारे लिलावाने " हा मजकूर समाविष्ट करण्यात येईल. सन १९५० चा मध्यप्रांत व वऱ्हाड अधिनियम क्रमांक २ याच्या कलम १६० ची सुधारणा.

सन १९५० चा मध्यप्रांत व वऱ्हाड अधिनियम क्रमांक २ याच्या कलम १६२ ची सुधारणा.

**७५.** नागपूर महानगरपालिका अधिनियमाच्या कलम १६२ मध्ये " नोटिशीची फी " हा मजकूर वगळण्यात येईल.

सन १९५० चा मध्यप्रांत व वऱ्हाड अधिनियम क्रमांक २ याच्या कलम १६३ ची सुधारणा.

**७६.** नागपूर महानगरपालिका अधिनियमाच्या कलम १६३ मध्ये, पोट-कलम (२) मधील " नाही त्याच्यावर कोणतीही मागणी नोटीस बजावण्याची आवश्यकता असणार नाही आणि " हा मजकूर वगळण्यात येईल.

सन १९५० चा मध्यप्रांत व वऱ्हाड अधिनियम क्रमांक २ याच्या कलम १६४ ची सुधारणा.

**७७.** नागपूर महानगरपालिका अधिनियमाच्या कलम १६४ मध्ये,—

(१) पोट-कलम (१) मधील, " कलम १५५ च्या पोट-कलम (१) खाली काढलेल्या कोणत्याही मागणीच्या नोटिशीविरुद्ध " या मजकुराऐवजी, " कलम १५४ च्या पोट-कलम (१) खाली सादर केलेल्या किंवा देण्यात आलेल्या बिलांमध्ये करण्यात आलेल्या हक्कमागणी विरुद्ध " हा मजकूर दाखल करण्यात येईल ;

(२) पोट-कलम (२) मधील, खंड (ख) मध्ये " पंधरा दिवसांच्या आत " या मजकुराऐवजी, " एकवीस दिवसांच्या आत " हा मजकूर दाखल करण्यात येईल ;

(३) पोट-कलम (२) नंतर, पुढील पोट-कलम समाविष्ट करण्यात येईल :—

" (२क) पोट-कलम (२) च्या खंड (क) ते (ग) च्या तरतुदींनुसार अपील दाखल केले नसेल तर, ते अपील फेटाळून लावण्यास पात्र ठरेल. ".

सन १९५० चा मध्यप्रांत व वऱ्हाड अधिनियम क्रमांक २ याच्या कलम १६५ ची सुधारणा.

**७८.** नागपूर महानगरपालिका अधिनियमाच्या कलम १६५ मधील परंतुक वगळण्यात येईल.

सन १९५० चा मध्यप्रांत व वऱ्हाड अधिनियम क्रमांक २ याच्या कलम ३५१ ची सुधारणा.

**७९.** नागपूर महानगरपालिका अधिनियमाच्या कलम ३५१ मधील खंड (ग) नंतर, पुढील खंड समाविष्ट करण्यात येईल :—

" (ग-एक) किंवा आयुक्तास योग्य वाटेल अशा, इलेक्ट्रॉनिक प्रसार माध्यमासह अन्य कोणत्याही पद्धतीद्वारे ".

सन १९५० चा मध्यप्रांत व वऱ्हाड अधिनियम क्रमांक २ याच्या कलम ३७४ ची सुधारणा.

**८०.** नागपूर महानगरपालिका अधिनियमाच्या कलम ३७४ मध्ये, " भाडे " या मजकुरानंतर " शास्ती " हा मजकूर समाविष्ट करण्यात येईल.

सन १९५० चा मध्यप्रांत व वऱ्हाड अधिनियम क्रमांक २ याच्या कलम ३९९ ची सुधारणा.

**८१.** नागपूर महानगरपालिका अधिनियमाच्या कलम ३९९ मधील परंतुकामध्ये, " लवाद अधिनियम, १९४० " या मजकुराऐवजी, " लवाद व समेट अधिनियम, १९९६ " हा मजकूर दाखल करण्यात येईल. १९४० चा १०. १९९६ चा २६.

८२. नागपूर महानगरपालिका अधिनियमाच्या कलम ४१५ मधील, खंड (१४) मध्ये,— सन १९५०चा मध्यप्रांत व वऱ्हाड अधिनियम क्रमांक २ याच्या कलम ४१५ ची सुधारणा.

(१) उप-खंड (च) मधील " मागणीच्या नोटिशींसाठी " या मजकुराऐवजी, " अधिपत्रासाठी " हा मजकूर दाखल करण्यात येईल ;

(२) खंड (ङ) मध्ये, " वार्षिक मूल्य " या मजकुरानंतर, " किंवा, यथास्थिति, भांडवली मूल्य " हा मजकूर समाविष्ट करण्यात येईल.

८३. नागपूर महानगरपालिका अधिनियमाच्या कलम ४२० मध्ये, पोट-कलम (२), खंड (ग) मधील " मागणीच्या नोटिशींसाठी " या मजकुराऐवजी, " अधिपत्रासाठी " या मजकूर दाखल करण्यात येईल. सन १९५०चा मध्यप्रांत व वऱ्हाड अधिनियम क्रमांक २ याच्या कलम ४२० ची सुधारणा.

८४. शंका दूर करण्यासाठी याद्वारे घोषित करण्यात येत आहे की, मालमत्ता कर बसविण्यासाठी आधार म्हणून भांडवली मूल्याचा स्वीकार करण्यासाठी, महानगरपालिकेने कलम ११५क च्या पोट-कलम (२) खाली निर्धारित केलेल्या दिनांकाच्या लगतपूर्वीच्या कोणत्याही कालावधीशी संबंधित, वार्षिक मूल्याच्या किंवा करयोग्य मूल्याच्या आधारे बसवलेल्या कोणत्याही मालमत्ता कराचे कोणतेही निर्धारण, पुनर्निर्धारण, तो बसविणे (शास्ती बसविण्यासह) आणि तो गोळा करणे यासंबंधीची सर्व कार्यवाही ही, या अधिनियमात काहीही अंतर्भूत असले तरी, परंतु त्यात अन्यथा स्पष्ट शब्दात तरतूद केली असेल त्याव्यतिरिक्त, जणू काही हा अधिनियम अधिनियमित करण्यात आला नसल्याप्रमाणे नागपूर महानगरपालिका अधिनियमान्वये सुरू राहील. शंका दूर करणे.

## प्रकरण चार

## महाराष्ट्र नगरपरिषदा, नगर पंचायती व औद्योगिक नगरी अधिनियम, १९६५ ची सुधारणा.

८५. महाराष्ट्र नगरपरिषदा, नगर पंचायती व औद्योगिक नगरी अधिनियम, १९६५ (यात यापुढे, या प्रकरणामध्ये ज्याचा निर्देश " नगरपरिषदा अधिनियम " असा करण्यात आला आहे) याच्या कलम १०५ मधील,— सन १९६५चा महाराष्ट्र अधिनियम क्रमांक ४० याच्या कलम १०५ ची सुधारणा.

१९६५ चा महा. ४०.

(१) पोट-कलम (१) मध्ये,—

(क) खंड (क) मध्ये " करयोग्य मूल्यावर " या मजकुरानंतर, " किंवा, यथास्थिति, भांडवली मूल्यावर " हा मजकूर समाविष्ट करण्यात येईल ;

(ख) दुसऱ्या परंतुकामध्ये " मालमत्तेवरील " या मजकुरानंतर, " किंवा सर्व किंवा कोणत्याही मालमत्तेवरील " हा मजकूर समाविष्ट करण्यात येईल ;

(२) पोट-कलम (२) नंतर पुढील पोट-कलमे जादा दाखल करण्यात येतील :—

" (३) मालमत्ता कर बसविण्याच्या प्रयोजनासाठी, " इमारत " या शब्दप्रयोगामध्ये, सदनिका, गाळा, युनिट किंवा इमारतीचा कोणताही भाग यांचा समावेश होतो.

(४) या अधिनियमाच्या अन्य कोणत्याही तरतुदीमध्ये काहीही अंतर्भूत असले तरी, परिषदेस या अधिनियमाच्या तरतुदीनुसार निर्धारित करता येईल अशा दरांनी व अशा दिनांकास आणि त्या दिनांकापासून इमारतींच्या व जमिनींच्या भांडवली मूल्यांच्या आधारे नगरपालिका क्षेत्रातील व इमारतींवर व जमिनींवर मालमत्ता कर बसविण्याची पद्धत स्वीकारण्याचा ठराव, संमत करता येईल :

परंतु, ज्या दिनांकापासून भांडवली मूल्यावर असा मालमत्ता कर बसविण्यात आला असेल अशा दिनांकापासून पाच वर्षांच्या कालावधीसाठी, असा कर,—

(एक) निवासी प्रयोजनांसाठी वापरण्यात येणाऱ्या इमारतींच्या बाबतीत, अशा दिनांकाच्या लगतपूर्वीच्या वर्षांमध्ये त्यांच्या बाबतीत बसविण्यायोग्य असलेल्या मालमत्ता कराच्या रकमेच्या दुप्पट रकमेपेक्षा अधिक असणार नाही ; आणि

(दोन) अनिवासी प्रयोजनांसाठी वापरण्यात येणाऱ्या इमारतींच्या किंवा जमिनींच्या बाबतीत, अशा दिनांकाच्या लगतपूर्वीच्या वर्षांमध्ये त्यांच्या बाबतीत बसविण्यायोग्य असलेल्या मालमत्ता कराच्या रकमेच्या तिप्पट रकमेपेक्षा अधिक असणार नाही :

परंतु आणखी असे की, कलम ११४ च्या पोट-कलम (३) अन्वये सुधारित केलेल्या, कोणत्याही इमारतींच्या किंवा जमिनींच्या भांडवली मूल्यांच्या आधारे बसविलेला मालमत्ता कर हा, काहीही झाले तरी, अशा सुधारणा केलेल्या वर्षाच्या लगतपूर्वीच्या वर्षामध्ये देय असलेल्या मालमत्ता कराच्या चाळीस टक्के इतक्या रकमेहून अधिक असणार नाही :

परंतु तसेच, या पोट-कलमान्वये भांडवली मूल्य हा आधार समजून मालमत्ता कर बसविण्याचा, स्वीकार केल्याच्या वर्षापासून सुरू होणाऱ्या पाच वर्षांच्या कालावधीकरिता, ४६.४५ चौरस मीटर (५०० चौरस फूट) किंवा त्यापेक्षा कमी करसवंद क्षेत्र असलेल्या निवासी इमारतीच्या किंवा निवासी गाळ्याच्या संबंधात, बसवावयाची मालमत्ता कराची रक्कम, भांडवली मूल्य हा आधार समजून मालमत्ता कर बसविण्याचा स्वीकार केल्याच्या वर्षाच्या लगतपूर्वीच्या वर्षांमध्ये बसविलेल्या व देय असलेल्या मालमत्ता कराच्या रकमेपेक्षा अधिक असणार नाही.

स्पष्टीकरण.— या कलमाच्या प्रयोजनांसाठी, नगरपरिषदेने भांडवली मूल्य हा आधार समजून, मालमत्ता कर बसविण्याचा स्वीकार केल्यानंतर, करयोग्य इमारतींच्या संबंधातील मालमत्ता कर दर प्रत्येक पाच वर्षांनंतर सुधारणा करण्यात येईल आणि अशा प्रत्येक सुधारणेनंतर, अशी मालमत्ता कराची रक्कम, कोणत्याही बाबतीत, सुधारणा केल्याच्या वर्षाच्या लगतपूर्वीच्या वर्षामध्ये, बसविलेल्या व देय असलेल्या मालमत्ता कराच्या रकमेच्या चाळीस टक्क्यांहून अधिक असणार नाही.

(५) या अधिनियमात अन्यथा तरतूद केली असेल त्याव्यतिरिक्त, नगरपरिषद, पोट-कलम (४) अन्वये, जमिनीवर व इमारतीवर त्यांच्या भांडवली मूल्याच्या आधारे मालमत्तेवरील कोणताही किंवा सर्व मालमत्ता कर किंवा एकत्रीकृत कर बसविण्याचा स्वीकार करेपर्यंत, परिषदेस अशा जमिनीच्या व इमारतीच्या करयोग्य मूल्याच्या आधारित सर्व किंवा कोणताही मालमत्ता कर किंवा एकत्रीकृत कर बसविणे चालू ठेवणे हे कायदेशीर असेल.”.

सन १९६५ चा महाराष्ट्र अधिनियम क्रमांक ४० याच्या कलम ११२ ची सुधारणा.

८६. नगरपरिषद अधिनियमाच्या कलम ११२ मधील, पोट-कलम (१) मधील परंतुकामधील खंड (क) मध्ये “ या नियमान्वये ” या मजकुराऐवजी “ या अधिनियमाच्या किंवा या नियमांच्या तरतुदींअन्वये ” हा मजकूर समाविष्ट करण्यात येईल.

सन १९६५ चा महाराष्ट्र अधिनियम क्रमांक ४० याच्या कलम ११४ ची सुधारणा.

८७. नगरपरिषद अधिनियमाच्या कलम ११४ मध्ये,—

(१) समासटीपेमध्ये “ करयोग्य मूल्य ” या मजकुरानंतर, “ किंवा भांडवली मूल्य ” हा मजकूर समाविष्ट करण्यात येईल ;

(२) पोट-कलम (२) नंतर, पुढील पोट-कलम जादा दाखल करण्यात येईल :—

“ (३) (क) मालमत्ता कर आकारणीयोग्य असलेल्या कोणत्याही इमारतीचे किंवा जमिनीचे भांडवली मूल्य निश्चित करण्यासाठी, मुख्य अधिकारी, मुंबई मुद्रांक अधिनियम, १९५८ याच्या तरतुदींन्वये तयार केलेले मुंबई मुद्रांक (संपत्तीचे वास्तविक बाजार मूल्य ठरवणे) नियम, १९९५ अन्वये, तयार १९५८ चा मुंबई ६०.

सन १९६५ चा महाराष्ट्र अधिनियम क्रमांक ४० याच्या कलम १२२ ची सुधारणा.

८९. नगरपरिषद अधिनियमाच्या कलम १२२ मधील खंड (एक) मध्ये, " कलम १२४ मध्ये विहित केलेल्या " या मजकुरानंतर, " करयोग्य मूल्याच्या किंवा, यथास्थिति, भांडवली मूल्याच्या " हा मजकूर समाविष्ट करण्यात येईल.

सन १९६५ चा महाराष्ट्र अधिनियम क्रमांक ४० याच्या कलम १२३ ची सुधारणा.

९०. नगरपरिषद अधिनियमाच्या कलम १२३ मध्ये,—

(१) पोट-कलम (१) मध्ये,—

(क) " किंवा ती पुन्हा बांधण्यात आली असेल तर " या मजकुराऐवजी, " ती पुन्हा बांधण्यात आली असेल, तिचा भोगवटा करण्यात आला असेल किंवा तीत पुन्हा भोगवटा करण्यात आला असेल किंवा तिच्या वापरकर्त्यांमध्ये बदल झाला असेल तर " हा मजकूर समाविष्ट करण्यात येईल ;

(ख) " किंवा पुन्हा बांधलेल्या " या मजकुरानंतर, " किंवा भोगवटा केलेल्या किंवा पुन्हा भोगवटा केलेल्या किंवा वापरकर्त्यांमध्ये बदल झालेल्या " हा मजकूर समाविष्ट करण्यात येईल ;

(२) पोट-कलम (२) नंतर, पुढील पोट-कलम समाविष्ट करण्यात येईल :—

" (२क) कोणत्याही नवीन इमारतीचे किंवा त्याच्या भागाचे बांधकाम करण्यात आले असेल, त्यात फेरफार करण्यात आला असेल किंवा त्यात भर घालण्यात आली असेल, तिचा पुन्हा भोगवटा करण्यात आला असेल, किंवा तिच्या वापरकर्त्यांमध्ये बदल झाला असेल तर, इमारतीवर निर्धारित केलेल्या मालमत्ता करासाठी मुख्यत: जबाबदार असणारी व्यक्ती, पंधरा दिवसांच्या आत, मुख्य अधिकाऱ्याकडे त्यासंबंधात लेखी नोटीस देईल.

(२ख) उक्त पंधरा दिवसांचा कालावधी हा, इमारतीचे किंवा त्याच्या भागाचे बांधकाम पूर्ण झाल्याच्या, त्यात फेरफार केल्याच्या, त्यात भर घालण्याच्या, तिचे पुन्हा बांधकाम केल्याच्या दिनांकापासून किंवा तिचा भोगवटा केल्याच्या, तिचा पुन्हा भोगवटा केल्याच्या किंवा त्याच्या वापरकर्त्यांमध्ये बदल झाल्याच्या दिनांकापासून मोजण्यात येईल. ";

(३) पोट-कलम (३) मध्ये, " यांपैकी जी गोष्ट प्रथम घडली असेल त्यादिवशी " या मजकुरानंतर, " किंवा अशा इमारतीच्या किंवा तिच्या भागाच्या बाबतीत, ती इमारत रिकामी करण्यात आली होती किंवा त्याबाबतीत तिच्या वापरकर्त्यांमध्ये बदल झाला आहे त्या दिवशी ती भोगवट्यात आली किंवा पुन्हा भोगवट्यात आली अथवा वापरकर्त्यांमध्ये बदल झाला त्या दिवशी, " हा मजकूर समाविष्ट करण्यात येईल.

सन १९६५ चा महाराष्ट्र अधिनियम क्रमांक ४० याच्या कलम १२४ ची सुधारणा.

९१. नगरपरिषद अधिनियमाच्या कलम १२४ मधील पोट-कलम (२) नंतर, पुढील पोट-कलम जादा दाखल करण्यात येईल :—

" (३) कलम १०५ च्या पोट-कलम (४) अन्वये नगरपरिषदेकडून मालमत्ता कर निर्धारित करण्यासाठी व तो बसविण्यासाठी, भांडवली मूल्य आधार म्हणून स्वीकार केल्याच्या दिनांकास व त्या दिनांकापासून, या अधिनियमाच्या तरतुदींनुसार, निश्चित केलेल्या भांडवली मूल्याच्या आधारे केलेले निर्धारण व त्याचा अवधी व त्याचे पुनर्विलोकन आणि त्याच्याशी संबंधित बाबी, यांचे भांडवली मूल्य निश्चित करण्याच्या आणि त्याचे पुनरीक्षण करण्याच्या संबंधातील तरतुदीनुसार नियमन करण्यात येईल आणि त्याच्या आधारे मालमत्ता कराचे निर्धारण करण्यात येईल. ".

१२. नगरपरिषद अधिनियमाच्या कलम १२५ मधील, पोट-कलम (१) मध्ये, खंड (ड) मधील, उप-खंड (तीन) नंतर पुढील उप-खंड समाविष्ट करण्यात येतील :— सन १९६५ चा महाराष्ट्र अधिनियम क्रमांक ४० याच्या कलम १२५ ची सुधारणा.

" (चार) जो मालक नाही अशा व्यक्तीने जागा धारण केली असेल किंवा ती तिचा भोगवटा करीत असेल आणि जागेच्या मालकाचा ठावठिकाणा निश्चित नाहीत नसेल तर, अशा धारकाकडून किंवा भोगवटादाराकडून ; आणि

(पाच) विकासकाने किंवा मुखत्याराने अथवा कोणत्याही व्यक्तीने जागा धारण केली असेल किंवा तिचा ताबा घेतला असेल—आणि अशा व्यक्तीने कोणत्याही नात्याने ती जागा धारण केलेली असेल आणि त्यापैकी प्रत्येकाला त्या जागेची विक्री करण्याचा अधिकार असेल किंवा तिने तो प्रदान केला असेल तर, अशा धारकाकडून, विकासकाकडून, मुखत्याराकडून किंवा, यथास्थिति, त्या व्यक्तीकडून :

परंतु, असा धारक, विकासक, मुखत्यार किंवा व्यक्ती प्रत्यक्ष विक्री होईपर्यंतच असा कर वसूल केला जाण्यास पात्र असेल. ".

१३. नगरपरिषद अधिनियमाच्या कलम १२६ मध्ये, — सन १९६५ चा महाराष्ट्र अधिनियम क्रमांक ४० याच्या कलम १२६ ची सुधारणा.

(१) पोट-कलम (१) नंतर, पुढील पोट-कलम समाविष्ट करण्यात आले :—

" (१क) पोट-कलम (१) मध्ये काहीही अंतर्भूत असले तरी, कलम १२४ च्या पोट-कलम (४) अन्वये मालमत्ता कर बसविण्याकरिता, भांडवली मूल्य हा आधार म्हणून स्वीकार केल्याच्या दिनांकास आणि त्या दिनांकापासून, परंतु या अधिनियमाच्या इतर तरतुदींस अधीन राहून, मुख्य अधिकाऱ्यास, उक्त जागेच्या अशा भोगवटादाराला मालमत्ता कराच्या रकमेकरिता बिल देता येईल किंवा अशा जागेचे दोन किंवा अधिक भोगवटादार असतील तर, त्यांपैकी प्रत्येकाला भांडवली मूल्याच्या आधारे कराच्या संपूर्ण रकमेसाठी देय असलेल्या रकमेच्या भागाकरिता, उक्त जागेच्या संबंधात भांडवली मूल्याच्या आधारे कराच्या एकूण रकमेशी, एक किंवा अनेक भोगवटादारांच्या जागेच्या अशा भागासाठी असलेल्या भांडवली मूल्याच्या, त्याच प्रमाणात देय असलेल्या रकमेकरिता बिल देता येईल. ";

(२) पोट-कलम (३) मध्ये " एका वर्षापेक्षा अधिक मुदतीपर्यंत देय राहिले असेल किंवा " हा मजकूर वगळण्यात येईल.

१४. नगरपरिषद अधिनियमाच्या कलम १३० मध्ये,— सन १९६५ चा महाराष्ट्र अधिनियम क्रमांक ४० याच्या कलम १३० ची सुधारणा.

(१) पोट-कलम (१) मधील " यथास्थिति, अनुसूची २ किंवा अनुसूची ३ मध्ये दिलेल्या नमुन्याप्रमाणे असेल " या मजकुरानंतर, " आणि संबंधित मुख्य अधिकारी, स्थायी समितीच्या मान्यतेने, वेळोवेळी विहित करील अशी फी जोडलेली असेल " हा मजकूर समाविष्ट करण्यात येईल ;

(२) पोट-कलम (२) मधील, " भारतीय " हा मजकूर वगळण्यात येईल ;

(३) पोट-कलम (२) नंतर, पुढील पोट-कलम जादा दाखल करण्यात येईल :—

" (३) हस्तांतरित करावयाच्या मालमत्तेच्या संबंधात देय असलेला मालमत्ता कर, अशी नोटीस देण्यापूर्वी पूर्णपणे भरण्यात आला नसेल तर, मुख्य अधिकारी मालमत्ता कर देण्यास प्रथमतः पात्र असलेल्या कोणत्याही व्यक्तीच्या हक्काच्या हस्तांतरणाची नोंद निर्धारण पुस्तकामध्ये घेणार नाही. "

सन १९६५ चा महाराष्ट्र अधिनियम क्रमांक ४० याच्या कलम १५० ची सुधारणा.

९५. नगरपरिषदा अधिनियमाच्या कलम १५० मध्ये,—

(१) समासटीपेमध्ये, " भरल्याबद्दल सूट देणे " या मजकुरानंतर, " किंवा करांमध्ये सवलत देणे " हा मजकूर जादा दाखल करण्यात येईल ;

(२) पोट-कलम (२) नंतर, पुढील पोट-कलम समाविष्ट करण्यात येईल :—

" (२क) प्रत्येक मालमत्ता कर हा, सहामाही हप्त्यांमध्ये आगाऊ भरावा लागेल आणि इतर देय रकमा देखील पोट-कलम (१) खाली सादर केलेल्या किंवा देण्यात आलेल्या बिलामध्ये विनिर्दिष्ट केलेल्या दिनांकास देय असतील. " .

सन १९६५ चा महाराष्ट्र अधिनियम क्रमांक ४० यामध्ये कलम १५०क व १५०ख समाविष्ट करणे.

९६. नगरपरिषदा अधिनियमाच्या कलम १५० नंतर, पुढील कलमे समाविष्ट करण्यात येतील :—

बिलांच्या न दिलेल्या रकमेवर शास्ती बसविणे.

"१५० क. (१) उपरोक्तप्रमाणे दिलेले असेल अशा बिलामध्ये विनिर्दिष्ट केल्याप्रमाणे पहिल्या सहामाही कराची रक्कम, बिल दिल्याच्या दिनांकापासून तीन महिन्यांच्या आत भरावयाची असेल आणि बिलामध्ये विनिर्दिष्ट केल्याप्रमाणे दुसऱ्या सहामाही कराची रक्कम, प्रत्येक वर्षाच्या ३१ डिसेंबरपूर्वी भरावयाची असेल ; आणि जर, कराची रक्कम भरण्यास पात्र असलेल्या व्यक्तीने उपरोक्तप्रमाणे आवश्यक असल्याप्रमाणे कराची रक्कम भरली नाही तर, अशी अदत्त कराची रक्कम किंवा त्या रकमेचा भाग यांच्यातिरिक्त, त्याने ज्या दिनांकापर्यंत असा कर भरावयाचा होता, त्या शेवटच्या दिनांकानंतर प्रत्येक महिन्यासाठी किंवा त्याच्या भागासाठी अशा कराच्या दोन टक्के इतकी रक्कम, शास्ती म्हणून भरण्यास तो जबाबदार असेल आणि बिलाची पूर्ण रक्कम देईपर्यंत अशी शास्ती भरण्यास तो जबाबदार असण्याचे चालू राहील :

परंतु, मुंबई प्रांतिक महानगरपालिका, नागपूर शहर महानगरपालिका, महाराष्ट्र नगरपरिषदा, नगर पंचायती व औद्योगिक नगरी, महाराष्ट्र (नागरी क्षेत्रे) झाडांचे संरक्षण व जतन आणि महाराष्ट्र (मोठ्या निवासी जागा असलेल्या) इमारतींवरील कर (पुन्हा अधिनियमित केलेला) (सुधारणा) अधिनियम, २००९ (यात यापुढे ज्याचा निर्देश " २००९ चा सुधारणा अधिनियम " असा करण्यात आला आहे) याच्या प्रारंभाच्या दिनांकापूर्वी, या अधिनियमान्वये ज्यासाठी बिल देण्यात आले आहे, असा कोणताही असल्यास, मालमत्ता कर पूर्णपणे किंवा अंशत: अदत्त राहिला असेल तर, ज्या व्यक्तीने असा कर भरलेला नाही ती व्यक्ती, उक्त २००९ च्या सुधारणा अधिनियमाच्या प्रारंभाच्या दिनांकास व दिनांकापासून, या कलमाअन्वये तरतूद केल्याप्रमाणे, अशा करावरील शास्ती भरण्यास जबाबदार असेल. २०१० चा महा. १०.

(२) बिलामधील अन्य कर किंवा मागणी केलेल्या देय रकमा बिलात विनिर्दिष्ट केलेल्या दिनांकास न भरल्यास, पोट-कलम (१) च्या तरतुदी, योग्य त्या फेरफारांसह, अशा न भरलेल्या रकमेला लागू होतील.

मालमत्ता कराची रक्कम भरण्याच्या सुविधेसाठी विशेष तरतूद.

१५०ख. या अधिनियमाअन्वये कराची रक्कम किंवा अन्य कोणत्याही देय रकमा भरण्यास पात्र असणाऱ्या कोणत्याही व्यक्तीस, नगरपरिषदेने तिच्या अधिकार क्षेत्रात प्रसृत होणाऱ्या दोन अग्रगण्य वर्तमानपत्रांमध्ये जाहीर नोटीस देऊन त्याबाबतीत नगरपरिषदेने विनिर्दिष्ट केलेल्या कोणत्याही बँकेत किंवा कोणत्याही अभिकरणाकडे त्या रकमेचा भरणा करण्याच्या सुविधेचा उपयोग करून घेता येईल ; आणि स्वत:ला अशा सुविधेचा उपयोग करून देणारी व्यक्ती, नगरपरिषद निर्धारित करील त्याप्रमाणे, अशा बँकेकडे किंवा, यथास्थिति, अभिकरणाकडे त्या संबंधातील अशी फी भरण्यास पात्र असेल. ".

९७. नगरपरिषदा अधिनियमाच्या कलम १५१ वगळण्यात येईल. सन १९६५ चा महाराष्ट्र अधिनियम क्रमांक ४० यामधील कलम १५१ वगळणे.

९८. नगरपरिषदा अधिनियमाच्या कलमे १५२ ऐवजी, पुढील कलम दाखल करण्यात येईल :— सन १९६५ चा महाराष्ट्र अधिनियम क्रमांक ४० यामध्ये कलम १५२ दाखल करणे.

" १५२. कलम १५० च्या पोट-कलम (१) मध्ये तरतूद केल्याप्रमाणे ज्या व्यक्तीस बिल देण्यात आले असेल किंवा ते बजावण्यात आले असेल त्या व्यक्तीने, जर, ज्या मुदतीच्या आत अशा दाव्याविरुद्ध अपील करता येते अशी मुदत समाप्त होण्याच्या आत,— अधिपत्र केव्हा काढता येईल

(क) बिलात विनिर्दिष्ट केलेल्या दिनांकापूर्वी, तरतुदींखाली आवश्यक करण्यात आलेला कर, शास्ती, व्याज, फी व अन्य कोणत्याही देय रकमा भरल्या नसतील ; किंवा

(ख) कलम १६९ च्या तरतुदींनुसार अशा दाव्याविरुद्ध अपील दाखल केले नाही तर, अशी रक्कम व ती वसूल करण्याचा सर्व खर्च, अनुसूची पाच च्या नमुन्यात असलेले किंवा तशा स्वरूपाचे, मुख्य अधिकाऱ्याच्या सहीचे अधिपत्र काढून कसूर करणाऱ्या व्यक्तीच्या जंगम किंवा स्थावर मालमत्तेची अटकावणी करून व ती विकून वसूल करता येईल :

परंतु, राज्य शासनाने दावा सांगितलेल्या कोणत्याही रकमेच्या वसुलीसाठी अशा कोणत्याही मालमत्तेच्या संबंधात कोणतेही सावधगिरीचे किंवा इतर उपाय योजण्यात आले असतील तर, अशा मालमत्तेच्या बाबतीत, या प्रकरणान्वये चालविलेली कोणतीही कारवाई समाप्त होईल ".

९९. नगरपरिषदा अधिनियमाच्या कलम १५६ मधील, पोट-कलम (१) मध्ये,— सन १९६५ चा महाराष्ट्र अधिनियम क्रमांक ४० याच्या कलम १५६ ची सुधारणा.

(१) ज्या ठिकाणी पहिल्यांदा " नोटीस " हा मजकूर आला असेल तो वगळण्यात येईल ;

(२) दुसऱ्यांदा आलेल्या " नोटिशीत " या मजकुराऐवजी " बिलात " हा मजकूर दाखल करण्यात येईल ;

(३) " जाहीर लिलावाद्वारे " या मजकुरानंतर " किंवा मोहोरबंद बोली मागवून लिलावाद्वारे " हा मजकूर समाविष्ट करण्यात येईल.

१००. नगरपरिषदा अधिनियमाच्या कलम १५९ मधील " कलम १५१ अन्वये काढलेल्या प्रत्येक नोटिशीबद्दलची फी " हा मजकूर वगळण्यात येईल. सन १९६५ चा महाराष्ट्र अधिनियम क्रमांक ४० याच्या कलम १५९ ची सुधारणा

१०१. नगरपरिषदा अधिनियमाच्या कलम १६० मधील पोट-कलम (२) मधील " मात्र कसूरदारावर मागणीची कोणतीही नोटीस बजावण्याची आवश्यकता असणार नाही " हा मजकूर वगळण्यात येईल. सन १९६५ चा महाराष्ट्र अधिनियम क्रमांक ४० याच्या कलम १६० ची सुधारणा.

सन १९६५ चा महाराष्ट्र अधिनियम क्रमांक ४० याच्या कलम १६१ ची सुधारणा.

१०२. नगरपरिषदा अधिनियमाच्या कलम १६१ मध्ये, " लिलावाद्वारे " या मजकुरानंतर " किंवा मोहोरबंद बोली मागवून लिलावाद्वारे " हा मजकूर समाविष्ट करण्यात येईल.

सन १९६५ चा महाराष्ट्र अधिनियम क्रमांक ४० याचे कलम १६६ वगळणे.

१०३. नगरपरिषदा अधिनियमाचे कलम १६६ वगळण्यात येईल.

सन १९६५ चा महाराष्ट्र अधिनियम क्रमांक ४० याच्या कलम १६८ ची सुधारणा.

१०४. नगरपरिषदा अधिनियमाच्या कलम १६८ मधील पोट-कलम (४) मध्ये, " मुंबई जमीन महसूल अधिनियम, १८७९ याचे प्रकरण १० " या मजकुराऐवजी " महाराष्ट्र जमीन महसूल संहिता, १९६६ याचे प्रकरण ११ " हा मजकूर दाखल करण्यात येईल. १८७९ चा मुंबई ५. १९६६ चा महा. ४१.

सन १९६५ चा महाराष्ट्र अधिनियम क्रमांक ४० याच्या कलम १६९ ची सुधारणा.

१०५. नगरपरिषदा अधिनियमाच्या कलम १६९ मधील पोट-कलम (२ क) मध्ये, " करपात्र मूल्य मध्ये " या मजकुरानंतर " किंवा, यथास्थिति, भांडवली मूल्य मध्ये " हा मजकूर समाविष्ट करण्यात येईल.

सन १९६५ चा महाराष्ट्र अधिनियम क्रमांक ४० याच्या कलम १७० ची सुधारणा.

१०६. नगरपरिषदा अधिनियमाच्या कलम १७० मधील,—

(१) खंड (क) मधील, परंतुक वगळण्यात येईल ;

(२) खंड (ग) मध्ये,—

(क) उप खंड (एक) मध्ये, " पोट-कलम (१) " या मजकुरानंतर, " किंवा, यथास्थिति, पोट-कलम (२) " हा मजकूर समाविष्ट करण्यात येईल ;

(ख) उप खंड (दोन) ऐवजी पुढील उप-खंड दाखल करण्यात येईल :—

(दोन) कलम १६९ आणि हे कलम यांच्या तरतुदींनुसार अपील दाखल करण्यात आले नसेल, तर ते अपील फेटाळण्यास पात्र ठरेल. ".

सन १९६५ चा महाराष्ट्र अधिनियम क्रमांक ४० यामध्ये कलम १७१क समाविष्ट करणे.

१०७. नगरपरिषद अधिनियमाच्या कलम १७१ नंतर पुढील कलम समाविष्ट करण्यात येईल :—

" १५१ क. पुनर्विलोकन अधिकाऱ्याने किंवा तदर्थ अधिकाऱ्यांच्या खंडपीठाने दिलेला निर्णय हा अंतिम असेल तेव्हा न्यायालयाद्वारे पुनरीक्षणासाठी तरतूद असलेल्या कलम १७१ च्या तरतुदींच्या आधारे आणि या तरतुदींच्या अनुसार, जर पुनरीक्षण किंवा अन्य कोणतीही कार्यवाही दाखल करण्यात आली असेल आणि ती प्रलंबित असेल तर, या अधिनियमामध्ये काहीही अंतर्भूत असले तरी, मात्र कलमे १६३ व १६४ यांच्या तरतुदींना अधीन राहून मुख्य अधिकाऱ्याने या अधिनियमाच्या तरतुदीअन्वये निर्धारित केलेल्या करयोग्य मूल्याच्या किंवा, यथास्थिति, भांडवली मूल्याच्या आधारे वर्षा वर्षाला मालमत्ता कर निर्धारित करणे, हे कायदेशीर असेल. ". मालमत्ता कर निर्धारण करण्याचा मुख्य अधिकाऱ्याचा अधिकार.

१०८. नगरपरिषदा अधिनियमाच्या कलम ३०९ मधील, पोट-कलम (१) च्या खंड (ड) मधील, " करयोग्य मूल्य " या मजकुरानंतर, " किंवा, यथास्थिति, भांडवली मूल्य " हा मजकूर समाविष्ट करण्यात येईल. सन १९६५ चा महाराष्ट्र अधिनियम क्रमांक ४० याच्या कलम ३०९ ची सुधारणा.

१०९. नगरपरिषदा अधिनियमाच्या कलम ३२९ मधील, पोट-कलम (२) च्या खंड (ख) नंतर पुढील खंड समाविष्ट करण्यात येईल :— सन १९६५ चा महाराष्ट्र अधिनियम क्रमांक ४० याच्या कलम ३२९ ची सुधारणा.

" (ख-एक) मुख्य अधिकाऱ्यास योग्य वाटेल त्यानुसार इलेक्ट्रॉनिक प्रसार माध्यमासह कोणत्याही अन्य पद्धतीने ; किंवा ".

११०. नगरपरिषदा अधिनियमाची अनुसूची चार वगळण्यात येईल. सन १९६५ चा महाराष्ट्र अधिनियम क्रमांक ४० याची अनुसूची चार वगळणे.

१११. नगरपरिषदा अधिनियमाच्या अनुसूची पाच मध्ये,— सन १९६५ चा महाराष्ट्र अधिनियम क्रमांक ४० याच्या अनुसूची पाचमध्ये सुधारणा.

(१) " आणि ती न भरल्याचे समाधानकारक कारण दाखविले नाही " हा मजकूर वगळण्यात येईल ;

(२) " या रकमेच्या " या मजकुराने सुरू होणाऱ्या व " गेला आहे " या मजकुराने संपणाऱ्या मजकुराऐवजी पुढील मजकूर दाखल करण्यात येईल :—

" त्याकरिता सादर करण्यात आलेल्या बिलात विनिर्दिष्ट केलेल्या दिनांकास अशाप्रकारे देय असलेली रक्कम भरली नाही. ".

११२. नगरपरिषदा अधिनियमाच्या अनुसूची सहा मधील " भागाने " हा मजकूर वगळण्यात येईल. सन १९६५ चा महाराष्ट्र अधिनियम क्रमांक ४० याच्या अनुसूची सहाची सुधारणा.

शंका दूर करणे. **११३.** शंका दूर करण्यासाठी याद्वारे असे घोषित करण्यात येत आहे की, भांडवली मूल्य हा आधार समजून मालमत्ता कर बसविण्याच्या स्वीकार करण्यासाठी, नगरपरिषदेने कलम १०५ च्या पोट-कलम (४) मध्ये निर्धारित केलेल्या दिनांकाच्या लगतपूर्वी कोणत्याही कालावधीशी संबंधित कर योग्य मूल्याच्या आधारे बसविलेल्या कोणत्याही मालमत्ता कराचे कोणतेही निर्धारण, पुनर्निर्धारण, तो बसविणे (शास्ती बसविण्यासह) आणि तो गोळा करणे यासंबंधीची सर्व कार्यवाही ही, या अधिनियमात काहीही अंतर्भूत असले तरी, परंतु त्यात अन्यथा स्पष्ट शब्दात तरतूद केली असेल त्या व्यतिरिक्त, जणू काही, हा अधिनियम अधिनियमित करण्यात आला नाही असे मानून, नगरपरिषद अधिनियमान्वये चालू ठेवण्यात येईल आणि तशी ती करण्यात येईल.

## प्रकरण पाच

## महाराष्ट्र (नागरी क्षेत्रे) झाडांचे संरक्षण व जतन अधिनियम, १९७५ याची सुधारणा

सन १९७५ चा महाराष्ट्र अधिनियम क्रमांक ४४ याच्या कलम १८ चे सुधारणा. **११४.** महाराष्ट्र (नागरी क्षेत्रे) झाडांचे संरक्षण व जतन अधिनियम, १९७५ याच्या कलम १८ मध्ये,--- १९७५ चा महा. ४४.

(१) पोट-कलम (१) नंतर, पुढील पोट-कलम समाविष्ट करण्यात येईल :---

" (१क) संबद्ध अधिनियमान्वये जेथे नागरी स्थानिक प्राधिकरण इमारतींवर आणि जमिनींवर भांडवली मूल्यानुसार मालमत्ता कर बसवित असेल, तेथे पोट-कलम (१) अन्वये बसविण्यात येणार वृक्ष उपकर, राज्य शासन, राजपत्रातील अधिसूचनेद्वारे विनिर्दिष्ट करील त्याप्रमाणे इमारतींच्या व जमिनींच्या भांडवली मूल्याच्या ०.५ टक्क्याहून अधिक असणार नाही अशा दराने बसविला जाईल :

परंतु, या कलमान्वये अशाप्रकारे बसविलेला वृक्ष उपकर,---

(एक) निवासी प्रयोजनासाठी वापरण्यात येणाऱ्या इमारतींच्या बाबतीत मालमत्ताकराच्या निर्धारणासाठी भांडवली मूल्य हा आधार समजून त्याचा स्वीकार केल्याच्या दिनांकाच्या लगतपूर्वीच्या वर्षामध्ये त्यांच्या बाबतीत बसविण्यायोग्य असलेल्या वृक्ष उपकराच्या रकमेच्या, दुप्पट रकमेपेक्षा अधिक असणार नाही, आणि

(दोन) अनिवासी प्रयोजनांसाठी वापरण्यात येणाऱ्या इमारतींच्या बाबतीत मालमत्ताकराच्या निर्धारणासाठी भांडवली मूल्य हा आधार समजून त्याचा स्वीकार केल्याच्या दिनांकाच्या लगतपूर्वीच्या वर्षामध्ये त्यांच्या बाबतीत बसविण्यायोग्य असलेल्या वृक्ष उपकराच्या रकमेच्या, तिप्पट रकमेपेक्षा अधिक असणार नाही :

परंतु, आणखी असे की, मालमत्ताकराच्या निर्धारणासाठी भांडवली मूल्य हा आधार म्हणून स्वीकार केल्यापासून पाच वर्षांच्या कालावधी करिता, ४६.४५ चौरस मीटर (५०० चौरस फूट) किंवा त्याहून कमी चटईक्षेत्र असलेली निवासी इमारत किंवा गाळा यांच्यासंबंधात, बसविण्यायोग्य वृक्ष उपकर, हा भांडवली मूल्य हा आधार म्हणून स्वीकारल्याच्या लगतपूर्वीच्या वर्षामध्ये बसविलेल्या आणि देय असलेल्या वृक्ष उपकराच्या रकमेहून अधिक असणार नाही.

स्पष्टीकरण.—या कलमाच्या प्रयोजनांसाठी नागरी स्थानिक प्राधिकरणाने, भांडवली मूल्य हा आधार समजून, मालमत्ताकर बसविण्याचा स्वीकार केल्यानंतर करयोग्य इमारतींच्या संबंधातील वृक्ष उपकाराच्या, प्रत्येक पाच वर्षानंतर सुधारणा करण्यात येईल आणि अशा प्रत्येक सुधारणेनंतर, अशी वृक्ष उपकराची रक्कम कोणत्याही बाबतीत सुधारणा केल्याच्या वर्षाच्या लगतपूर्वीच्या वर्षामध्ये, बसविलेल्या व देय असलेल्या वृक्ष उपकराच्या रकमेच्या चाळीस टक्क्यांहून अधिक असणार नाही. ";

(२) पोट-कलम (२) मधील, " पोट-कलम (१) " या मजकुराऐवजी, " पोट-कलम (१) किंवा, यथास्थिति, पोट-कलम (१क) " हा मजकूर दाखल करण्यात येईल.

## प्रकरण सहा

## महाराष्ट्र (मोठ्या निवासी जागा असलेल्या) इमारतींवरील कर (पुन्हा अधिनियमित केलेला) अधिनियम, १९७९ ची सुधारणा

१९७९ चा महा. २९. **११५.** महाराष्ट्र (मोठ्या निवासी जागा असलेल्या) इमारतींवरील कर (पुन्हा अधिनियमित केलेला) अधिनियम, १९७९ (यात यापुढे या प्रकरणात, ज्याचा निर्देश " इमारतींवरील कर अधिनियम " असा करण्यात आला आहे.) याच्या कलम २ मध्ये, खंड (घ) नंतर, पुढील खंड समाविष्ट करण्यात येईल :— सन १९७९ चा महाराष्ट्र अधिनियम क्रमांक २९ याच्या कलम २ ची सुधारणा.

"(ङ १) " भांडवली मूल्य " याचा अर्थ, संबद्ध महानगरपालिका कायद्याच्या तरतुदींना अनुसरून निश्चित केलेले किंवा निर्धारित केलेले इमारतीचे किंवा तिच्या भागाचे भांडवली मूल्य असा आहे ; ".

**११६.** इमारतींवरील कर अधिनियमाच्या कलम ३ मधील, पोट-कलम (३) नंतर, पुढील पोट-कलम जादा दाखल करण्यात येईल :— सन १९७९ चा महाराष्ट्र अधिनियम क्रमांक २९ याच्या कलम ३ ची सुधारणा.

"(४) महानगरपालिकेने, संबद्ध महानगरपालिका कायद्याच्या तरतुदींअन्वये भांडवली मूल्याच्या आधारे, जमिनींवर व इमारतींवर मालमत्ता कर बसविला असेल, तेथे, महानगरपालिका क्षेत्रांमध्ये कोणत्याही निवासी जागा असलेल्या सर्व इमारतींवर किंवा त्यांच्या भागांवर,—

(एक) जर, ती जागा बृहन्मुंबई क्षेत्रात असेल व अशा जागांचे तल क्षेत्र १२५ चौरस मीटरहून अधिक असेल,

(दोन) जर, ती जागा इतर, महानगरपालिका क्षेत्रात असेल व अशा जागेचे तल क्षेत्र १५० चौरस मीटरहून अधिक असेल ;

तर राज्य शासन, राजपत्रातील अधिसूचनेद्वारे विनिर्दिष्ट करील, अशा भांडवली मूल्याच्या ०.०५ टक्क्यांहून अधिक असणार नाही अशा दराने कर आकारण्यात येईल :

परंतु, जेथे संबद्ध महानगरपालिका कायद्याअन्वये महानगरपालिकेने भांडवली मूल्याच्या आधारे मालमत्ता कर सुधारित केला असेल, तर या अधिनियमाअन्वये बसविण्यात आलेला कर, अशा सुधारणा केलेल्या वर्षानंतर लगतपूर्वीच्या वर्षात देय असलेल्या मालमत्ता कराच्या चाळीस टक्के इतक्या रकमेहून अधिक असणार नाही. ".

ON BEHALF OF GOVERNMENT PRINTING, STATIONERY AND PUBLICATION, PRINTED AND PUBLISHED BY SHRI PARSHURAM JAGANNATH GOSAVI, PRINTED AT GOVERNMENT CENTRAL PRESS, 21-A, NETAJI SUBHASH ROAD, CHARNI ROAD, MUMBAI 400 004 AND PUBLISHED AT DIRECTORATE OF GOVERNMENT PRINTING, STATIONERY AND PUBLICATION, 21-A, NETAJI SUBHASH ROAD, CHARNI ROAD, MUMBAI 400 004. EDITOR : SHRI PARSHURAM JAGANNATH GOSAVI

RNI No. MAHBIL/2009/31748




# महाराष्ट्र शासन राजपत्र

## असाधारण भाग एक-अ—मध्य उप-विभाग

वर्ष २, अंक १५(२)] सोमवार, मे ३१, २०१०/ज्येष्ठ १०, शके १९३२ [पृष्ठे २, किंमत : रुपये २०.००

असाधारण क्रमांक ५३

**प्राधिकृत प्रकाशन**

महाराष्ट्र जिल्हा परिषदा व पंचायत समित्या, ग्रामपंचायती, नगरपरिषदा, प्राथमिक शिक्षण आणि स्थानिक निधी लेखापरीक्षा अधिनियम यांखालील (भाग चार-ब मध्ये प्रसिद्ध करण्यात आलेले आदेश व अधिसूचना यांव्यतिरिक्त) आदेश व अधिसूचना.

### नगरविकास विभाग

मंत्रालय, मुंबई ४०० ०३२, दिनांक ३१ मे २०१०

**अधिसूचना**

**मुंबई प्रांतिक महानगरपालिका अधिनियम, नागपूर शहर महानगरपालिका अधिनियम, महाराष्ट्र नगरपरिषदा, नगरपंचायती व औद्योगिक नगरी अधिनियम, महाराष्ट्र (नागरी क्षेत्रे) झाडांचे संरक्षण व जतन आणि महाराष्ट्र (मोठ्या निवासी जागा असलेल्या) इमारतींवरील कर (पुन्हा अधिनियमित केलेला) (सुधारणा) अधिनियम, २००९.**

क्रमांक एमसीओ. २००८/६६६/प्र.क्र. ५६७/०८/नवि ३२.— मुंबई प्रांतिक महानगरपालिका अधिनियम, नागपूर शहर महानगरपालिका अधिनियम, महाराष्ट्र नगरपरिषदा, नगरपंचायती व औद्योगिक नगरी अधिनियम, महाराष्ट्र (नागरी क्षेत्रे) झाडांचे संरक्षण व जतन आणि महाराष्ट्र (मोठ्या निवासी जागा असलेल्या) इमारतींवरील कर (पुन्हा अधिनियमित केलेला) (सुधारणा) अधिनियम, २००९ (२०१० चा महा. १०) याच्या कलम १ च्या पोट-कलम (२) अन्वये प्राप्त झालेल्या अधिकारांचा वापर करून महाराष्ट्र शासन याद्वारे असा निदेश देत आहे की, उक्त अधिनियम, दिनांक १ जून २०१० पासून अमलात येईल.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

**मनु कुमार श्रीवास्तव,**
शासनाचे सचिव

## URBAN DEVELOPMENT DEPARTMENT

Mantralaya, Mumbai 400 032, dated the 31st May 2010

*NOTIFICATION*

BOMBAY PROVINCIAL MUNICIPAL CORPORATIONS, THE CITY OF NAGPUR CORPORATION, THE MAHARASHTRA MUNICIPAL COUNCILS, NAGAR PANCHAYATS AND INDUSTRIAL TOWNSHIPS, THE MAHARASHTRA (URBAN AREAS) PROTECTION AND PRESERVATION OF TREES AND THE MAHARASHTRA TAX ON BUILDINGS (WITH LARGER RESIDENTIAL PREMISES) (RE-NACTED) (AMENDMENT) ACT, 2009.

No. MMC. 2008/446/CR-167/UD-32.—In exercise of the powers conferred by sub-section (2) of section 1 of the Bombay Provincial Municipal Corporations, the City of Nagpur Corporation, the Maharashtra Municipal Councils, Nagar Panchayats and Industrrial Townships, the Maharashtra (Urban Areas) Protection and Preservation of Trees and the Maharashtra Tax on Buildings (with larger Residential Premises) (Re-enacted) (Amendment) Act, 2009 (Mah. X of 2010), the Government of Maharashtra hereby appoints the 1st June 2010, to be the date on which the said Act shall come into force.

By order and in the name of the Governor of Maharashtra,

MANU KUMAR SRIVASTAVA,
Secretary to Government.

ON BEHALF OF GOVERNMENT PRINTING, STATIONERY AND PUBLICATION, PRINTED AND PUBLISHED BY SHRI PARSHURAM JAGANNATH GOSAVI, PRINTED AT GOVERNMENT CENTRAL PRESS, 21-A, NETAJI SUBHASH ROAD, CHARNI ROAD, MUMBAI 400 004 AND PUBLISHED AT DIRECTORATE OF GOVERNMENT PRINTING,